पहिली आवृत्ती (शके १९०८) १९८६



VISHNUSHASTRI CHIPLOONKAR (*Marathi*)

मूल्य रु. १२

प्रकाशक : संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, ए–५ ग्रीन पार्क
नवी दिल्ली ११००१६

मुद्रक : नाना डेंगळे, साधना प्रेस, ४३०।३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०

# प्रस्तावना

एकोणिसाव्या शतकाच्या पार्श्वभूमीवर विष्णुशास्त्री चिपळूणकरांची जीवनकहाणी या पुस्तकात सांगितली आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकर या नामवंत मराठी लेखकाचे व संस्कृत विद्येच्या गाढ्या अभ्यासकाचे विष्णुशास्त्री हे ज्येष्ठ चिरंजीव होते. १८५० ते १८८२ या अवघ्या बत्तीस वर्षांच्या अल्पायुष्यात लढाऊ राष्ट्रवादाचा पुरस्कार करून तसेच सामाजिक व धार्मिक बाबतीत परंपरा जतन करण्याच्या धोरणाचा पाठपुरावा करून विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी समकालीनांना स्फूर्ती दिली. तसेच त्यांना बेचैन केले. बोचरा विनोद आणि झोंबणारा उपहास यांचा त्यांनी सतत वापर करून खिरस्ती धर्मोपदेशक व उदार-मतवादी हिंदू सुधारक यांची भरपूर कुचेष्टा व हेटाळणी केली कारण ही मंडळी हिंदू धर्म आणि हिंदूंचा सांस्कृतिक वारसा यांना बदनाम करीत आहेत असे विष्णुशास्त्री यांना वाटत होते.

केवळ मराठी वाङ्मयाच्या इतिहासातच नव्हे तर एकोणिसाव्या शतकातील महा-राष्ट्राच्या सामाजिक इतिहासातलाही एक महत्त्वाचा टप्पा म्हणून विष्णुशास्त्री चिपळूण-करांच्या निबंधमालेचा निर्देश केला जातो. असे असूनही इंग्रजी भाषेत अलीकडेपर्यंत या आधुनिक मराठी साहित्याच्या शिल्पकाराचे चरित्र लिहिले गेले नव्हते. म्हणूनच नॅशनल बुक ट्रस्टतर्फे प्रकाशित होणाऱ्या राष्ट्रीय चरित्रमालेतील एक पुस्तक म्हणून १९८२ साली मी विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे छोटेसे इंग्रजी चरित्र लिहिले आणि बिगर-मराठी भाषिक अभ्यासकांना जाणवणारी उणीव भरून काढण्याचा प्रयत्न केला. त्या मूळ इंग्रजी चरित्राचे हे मराठी रूपांतर आहे. मूळ इंग्रजी चरित्र लिहिताना विष्णुशास्त्री यांचे प्रकाशित मराठी साहित्य, त्यांचा खासगी इंग्रजी पत्रव्यवहार तसेच 'केसरी' या त्यांनी सुरू केलेल्या वृत्तपत्राचे आरंभीच्या वर्षांतील अंक यांचा आधार घेतला होता.

मूळ इंग्रजी चरित्राचा पहिला मसुदा मुंबई विद्यापीठाच्या राज्यशास्त्र विभागातील प्राध्यापक श्रीनिवासन यांनी काळजीपूर्वक वाचून उपयुक्त सूचना केल्या होत्या त्याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे.

श्री. म. श्री. दीक्षित व प्रा. न. म. जोशी या पुण्याच्या मराठी साहित्य परिषदेच्या चिटणीसांनी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे एक दुर्मिळ छायाचित्र ब्लॉक करून घेण्यासाठी उपलब्ध करून दिले याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

खालील संस्थांनी तत्परतेने आवश्यक ते संदर्भग्रंथ मला उपलब्ध करून दिले याबद्दल त्यांचेही मनःपूर्वक आभार मानतो. (१) प्रशासकीय अधिकारी महाविद्यालय, मुंबई, (२) मुंबई विद्यापीठ, (३) मुंबईतील ब्रिटिश कौन्सिल, (४) मराठी साहित्य परिषद, पुणे आणि (५) केसरी–मराठा संस्था, पुणे. या संस्थांच्या ग्रंथालयांतील ग्रंथपाल व त्यांचे सहकारी यांच्या साहाय्यामुळे पुस्तकाचे लेखन पुरे करणे शक्य झाले.

य. दि. फडके

# अनुक्रमणिका

# १ : कालखंडाची पार्श्वभूमी

आधुनिक मराठी वाङ्मयाच्या निर्मात्यांमध्ये विष्णुशास्त्री किंवा धाकटे शास्त्रीबुवा या नावाने ओळखल्या जाणाऱ्या विष्णु कृष्ण चिपळूणकर ( १८५०–८२ ) यांना मानाचे स्थान दिले जाते. एकेकाळी पेशव्यांची राजधानी असलेल्या पुणे शहरात विष्णुशास्त्री जन्मले आणि वाढले. याच ऐतिहासिक शहरात त्यांनी आयुष्यातील बरीचशी वर्षे घालवली. वयाच्या अवघ्या बत्तिसाव्या वर्षी अकाली निधनामुळे त्यांच्या आयुष्याची अखेर झाली. इतक्या थोड्या वर्षांच्या आयुष्यात त्यांनी मराठी भाषा व वाङ्मय यांची बहुमोल सेवा केली. इंग्रजी भाषेत व साहित्यात मिल्टन व मेकॉले यांना जे स्थान दिले जाते ते मराठी भाषेत व साहित्यात विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना द्यावयास हवे असे म्हटले जाते. संस्कृतप्रचुर, अलंकारिक व ओजस्वी शैलीत लिहिलेले आणि नेहमी वादाचा विषय बनलेले त्यांचे निबंध जेव्हा प्रसिद्ध झाले तेव्हा फार खळबळ उडाली. त्यांच्या लढाऊ राष्ट्रवादी विचारसरणीमुळे तसेच सामाजिक व धार्मिक बाबतीत परंपरा जतन करू पाहण्याच्या त्यांच्या वृत्तीमुळे समकालीनांना जशी त्यांनी स्फूर्ती दिली त्याप्रमाणेच त्यांना अस्वस्थ केले. आजही त्यांचे लेखन वाचताना त्यांच्या भाषाप्रभुत्वाची जशी वाखाणणी केली जाते तशीच त्यांच्या काही मतांवर कडक टीकाही केली जाते. व्यक्तित्वाबरोबरच त्यांचे लेखनही समजावून घ्यावयाचे असेल तर गेल्या शतकाच्या उत्तरार्धाच्या पार्श्वभूमीवर त्यांची जीवनकहाणी सांगावयास हवी.

इ. स. १८१८ साली दुसऱ्या बाजीराव पेशव्याचा पराभव झाला आणि आज ज्या प्रदेशाला पश्चिम महाराष्ट्र म्हणण्यात येते तो प्रदेश इंग्रजी अमलातील मुंबई इलाख्याचा भाग बनला. ईस्ट इंडिया कंपनीने माउंट स्टुअर्ट एलफिन्स्टन या विद्याप्रेमी तसेच धूर्त मुत्सद्याची मुंबई इलाख्याचा गव्हर्नर म्हणून नेमणूक केली. १८१९ ते १८२७ या त्याच्या कारकीर्दीत त्याने एकेकाळी पेशव्यांच्या ताब्यात असलेल्या प्रदेशात नव्या इंग्रजी राजवटीला स्थैर्य मिळवून दिले. एलफिन्स्टनची वृत्तीही परंपरा जतन करून आस्ते आस्ते बदल लोकांच्या गळी उतरवणाऱ्या माणसासारखीच होती. ब्राह्मण बुद्धिमंतांना हलके हलके पाश्चिमात्य संस्कृतीच्या प्रभावाखाली आणावयाचे असे त्याचे धोरण होते. पेशवाईत एकूणच ब्राह्मणांचा वरचष्मा होता. त्यातही चित्पावन किंवा कोकणस्थ या नावाने ओळखल्या जाणाऱ्या पोटजातीतील ब्राह्मणांचे महाराष्ट्रातील समाजजीवन व राजकारण यांवर वर्चस्व होते. त्यांच्या हातातील सत्ता गेल्याने ते रुष्ट झाले होते. शक्य झाल्यास त्यांना नव्या राज्यकर्त्यांच्या बाजूला ओढा-

वयाचे नाहीतर निदान इंग्रजी राजवटीपासून ते अधिक दुरावणार नाहीत असा प्रयत्न करणे आवश्यक होते म्हणून एलफिन्स्टनने सावधगिरीचे व सलोख्याचे धोरण अवलंबिले. ब्राह्मणांना दक्षिणा देण्याचे पेशव्यांचे धोरण त्याने चालूच ठेवले. संस्कृत भाषेच्या अभ्यासास उत्तेजन देण्यास आणि मराठी माध्यमातून शिकविण्यास तो राजी होता. १८२१ साली एलफिन्स्टनने एक शाळा सुरू केली. त्याची परिणती १८५१ साली पुण्यात महाविद्यालयाची स्थापना करण्यात झाली. या महाविद्यालयास १८६४ साली डेक्कन कॉलेज हे नाव देण्यात आले.

बंगालप्रमाणेच मुंबई इलाख्यातील मोजक्या लब्धप्रतिष्ठित मंडळींनाही भारतीय समाजातील उणिवा हळूहळू जाणवू लागल्या. पाश्चिमात्य संस्कृतीच्या यशामुळे ही मंडळी दिपली होती. नवे इंग्रज सत्ताधीश आपल्यापेक्षा वरचढ आहेत या जाणिवेमुळे तसेच ख्रिस्ती धर्मोपदेशक देत असलेल्या आव्हानामुळे भारतातील समाजरचना, धार्मिक समजुती आणि आपला सांस्कृतिक वारसा तपासून पाहण्याची आवश्यकता असल्याचे त्यांच्या लक्षात आले. या मंडळींच्या काही स्फुट गद्य लेखनात शोध घेण्याच्या व टीका करण्याच्या वृत्तीचे प्रतिबिंब पडू लागले. इंग्रजी राजवट ही शाप नसून वरदान आहे अशी त्यांची धारणा होती. इंग्रजी राजवटीमुळे आपला समाज सुधारण्याची आणि अखेर गेलेले स्वातंत्र्य पुन्हा मिळवून ते टिकवण्यास आवश्यक ती पात्रता अंगी आणण्याची संधी आपल्याला मिळाली आहे असे त्यांना वाटत होते. म्हणूनच परक्या राजवटीचा धिक्कार करण्याऐवजी भारतात दूरगामी परिणाम घडवून आणणाऱ्या इंग्रज राजवटीची तारीफ करण्यात या बुद्धिमंतांमध्ये चढाओढ सुरू झाली.

बाळशास्त्री जांभेकर (१८१२–१८४६) व 'लोकहितवादी' या टोपण नावाने लेखन करणारे गोपाळराव हरी देशमुख (१८२३–१८९२) हे दोघे पाश्चिमात्य संस्कृतीने प्रभावित झालेल्या महाराष्ट्रातील बुद्धिमंतांच्या पहिल्या पिढीचे प्रतिनिधी होते. हे दोघेही इंग्रज राजवटीचे मोठे चाहाते होते. त्यांनी या राजवटीमुळे झालेल्या फायद्यांवर विशेष भर दिला. बाळशास्त्री जांभेकर हे 'मुंबई दर्पण' या वृत्तपत्राचे संपादक होते. त्याच्या पहिल्याच अंकात त्यांनी लिहिले आहे,

"बंगाल प्रांत इंग्रजांचे हाती पडल्यास साठ-सत्तर वर्षे झाली; परंतु इतक्यातच त्या देशाचे स्थितीत जे अंतर पडले ते पाहिले असता विस्मय होतो. जो देश सुमारे शंभर वर्षांपूर्वी बलात्कार, जुलूम आणि कुनीती यांचे केवळ घर होता तो आता निर्भयपणा आणि स्वतंत्रता भोगतो, आणि तेथील लोकांस युरोपखंडातील विद्या आणि कळांचे विशेष ज्ञान होत आहे हे पाहून चांगला राजा आज्ञेत वागणाऱ्या प्रजांचे कल्याण करायास इच्छितो तर त्याचे हातून काय काय घडेल यास योग्य दृष्टान्त सापडतो."

इंग्रजांच्या अंगी अनेक गुण आहेत आणि ते भारतीयांच्या अंगीही यावेत म्हणून परमेश्वरानेच या दोन लोकसमूहांना एकत्र आणले आहे असे लोकहितवादींना वाटत होते.

स्वतः चित्पावन ब्राह्मण कुटुंबात जन्मलेले असूनही ब्राह्मणांचे अज्ञान, त्यांचा आळस, लोभ, मूर्खपणा व भित्रेपणा या दुर्गुणांवर लोकहितवादींनी नेहमीच झोड उठवली. १८४८ ते १८५० या काळात लोकहितवादींनी 'प्रभाकर' या वृत्तपत्रात शंभराहून अधिक पत्रे प्रसिद्ध केली. ब्राह्मणांनी आपले वर्तन सुधारावे, तसेच ज्या समाजाचे ते नेतृत्व करीत होते तो समाजही सुधारावा असे त्यांनी या पत्रांत आग्रहाने प्रतिपादन केलेले दिसते. या काळात ईस्ट इंडिया कंपनीचे अधिकारी ख्रिस्ती धर्मातील एव्हांगेलिकल मतप्रणालीमुळे व उपयुक्तता-वादी तत्त्वज्ञानामुळे प्रभावित झालेले होते, त्यामुळे भारतात सामाजिक व धार्मिक सुधारणा घडवून आणण्याबाबत ते विशेष आस्था दाखवीत होते हे लक्षात घेणे जरूर आहे. १८२८ ते १८५६ या काळात म्हणजे बेंटिंक ते डलहौसी या ईस्ट इंडिया कंपनीच्या गव्हर्नर जनरलांच्या कारकीर्दीत सती जाण्यास बंदी किंवा विधवांना पुनर्विवाह करण्यास मुभा देणारे कायदे करण्यात आले. इंग्रजी हे शिक्षणाचे माध्यम बनले आणि कायद्यांचे पद्धतशीर एकत्रीकरण करण्याचे काम कायदा आयोगावर सोपविण्यात आले. आगगाड्या, तारायंत्रे, टपालव्यवस्था वगैरे वाहतुकीच्या व दळणवळणाच्या आधुनिक साधनांच्या वापरामुळे भारतीय समाज व अर्थव्यवस्था यावर दूरगामी परिणाम होणे अटळ होते. ईस्ट इंडिया कंपनीच्या या नजरेत भरण्याजोग्या कामगिरीमुळे त्यांच्याकडून शिकण्यासाठी इंग्रजांबरोबरचे साहचर्य काही काळ चालू राहाणे भारतीयांच्याच हिताचे आहे असे लोकहितवादी यांच्यासारख्या तरुण बुद्धिमंतांना वाटत होते.

इंग्रजी राजवट व तिचे फायदे यामुळे हुरळून जाणे काही भारतीयांना नापसंत होते. भास्कर पांडुरंग तर्खडकर (१८१६–१८४७) हे अशा मोजक्या मंडळींपैकी एक होते. भास्कर पांडुरंग तर्खडकर हे विख्यात व्याकरणकार दादोबा पांडुरंग तर्खडकर (१८१४–१८८२) आणि प्रार्थनासमाजाचे पहिले अध्यक्ष डॉ. आत्माराम पांडुरंग, यांचे बंधू होते. १८४१ साली भास्कर पांडुरंग तर्खडकर यांनी 'बॉंबे गॅझेट' या वृत्तपत्रात आठ पत्रे प्रसिद्ध केली. इंग्रजांचा उद्धटपणा व घमेंड याबद्दल कडक टीका करून कायदेमंडळात व उच्च प्रशासकीय सेवेत भारतीयांना प्रतिनिधित्व न देण्याबद्दल त्यांनी इंग्रज राज्यकर्त्यांना दोषी ठरवले. इंग्रजांनी चालवलेल्या भारताच्या शोषणाबद्दलचा सिद्धांत दादाभाई नौरोजींनी मांडला त्यापूर्वी कितीतरी वर्षे आधी इंग्रज भारतातील संपत्ती लुटून भारताला दरिद्री बनवीत असल्याबद्दल भास्करराव तर्खडकरांनी इंग्रजी राजवटीचा धिक्कार केला. सती तसेच भ्रूणहत्या यासारख्या दुष्ट रूढी नष्ट केल्याबद्दल आणि ठगांच्या बंदोबस्त केल्याबद्दल त्यांनी इंग्रजांना श्रेय दिले. मात्र "इंग्रजांची ही सारी मानवतावादी कामे राजकीय क्रौर्याच्या प्रचंड भोवऱ्यात विरून जातात" असे त्यांना वाटत होते. राज्यकर्त्यांचा बिलकुल मुलाहिजा न ठेवता फटकळपणे त्यांनी इंग्रजांना बजावले, "तुमच्या राजवटीचा धिक्कार असो! भारताला आतापर्यंत मिळालेला सर्वांत मोठा शाप याखेरीज आम्ही तुमच्या राजवटीस दुसरे काही मानीत नाही. भारताची सर्व संपत्ती आता ग्रेट ब्रिटनमध्ये नेण्यात आली आहे आणि

आम्हांला रोजगार राहिलेला नाही." १८४७ साली भास्करराव तर्खडकरांचे अकाली निधन झाल्यानंतर जवळजवळ तीस वर्षांनंतर विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीही आपल्या निबंधांत कोरडे ओढून इंग्रज राजवटीवर अशीच निर्भीड टीका केली.

काही तुरळक घटना सोडता १८५७ च्या उठावाला महाराष्ट्रात फारसा प्रतिसाद मिळाला नाही. मात्र या उठावाने उत्तर व मध्य भारतातील इंग्रजी राजवटीचा पाया पार उखडून जाईल की काय असे वाटण्याजोगी परिस्थिती निर्माण झाली होती. १८५७ नंतरच्या काळात इंग्रज राज्यकर्त्यांनी धार्मिक बाबतीत हस्तक्षेप करावयाचा नाही, तसेच सामाजिक सुधारणा कायदे करून अमलात आणण्यात पुढाकार घ्यावयाचा नाही असा निर्णय घेतला. १८५७ नंतरच्या काळात याबाबतची सावधगिरी हे इंग्रजांच्या धोरणाचे मुख्य सूत्र होते. भारतातील बहुसंख्य लोक परंपरानिष्ठ असल्यामुळे त्यांच्या संतापास तोंड देण्याची परकीय राज्यकर्त्यांची इच्छा नव्हती.

इंग्लंडमधील औद्योगिक क्रांतीच्या पहिल्या पर्वाचे परिणाम एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात पूर्णतया स्पष्ट झाले. भारतातील उद्योगधंद्यांचा झपाट्याने होत चाललेला ऱ्हास, शेतीचे व्यापारीकरण आणि भारतातील शेतकऱ्यांची वाढती कंगाल स्थिती या गोष्टी पाहून लोकहितवादी यांच्यासारख्या इंग्रज राजवटीच्या उत्साही चाहत्यांचाही काहीसा भ्रमनिरास झाला. तरीही माणसाची प्रतिष्ठा व व्यक्तीचे स्वातंत्र्य या पाश्चिमात्यांच्या मूल्यांनी भारल्या-मुळे सुधारकांनी भारतीय समाजव्यवस्थेतील विषमता, प्राचीन धर्मग्रंथांचा अगर हिंदू कायद्यावरची कालबाह्य भाष्ये यांचा आधार असलेल्या दुष्ट रूढींवर हल्ला चढवणे चालूच ठेवले. त्यामुळे समाजातील कर्मठ सनातन्यांच्या गटाबरोबर त्यांचा संघर्ष होणे अटळ होते. सुधारकांच्या विरोधकांनी त्यांना वाळीत टाकले. उक्तीप्रमाणे कृती करण्याचे धैर्य अनेक समाजसुधारकांजवळ नव्हते, त्यामुळे विरोधकांनी, मित्रांनी व निकटच्या नातेवाईकांनी दडपण आणले की त्याला ते बळी पडत. १८७३ च्या ऑक्टोबर महिन्यात महादेव गोविंद रानडे (१८४२–१९०१) यांच्या पहिल्या पत्नीचे निधन झाले. तेव्हा एखाद्या विधवेशी विवाह करण्याऐवजी वडिलांनी पसंत केलेल्या कुमारिकेशी त्यांनी विवाह केला. त्याचप्रमाणे आपण विधवाविवाहास हजर राहिल्यास आपल्या विवाहित कन्येला तिच्या सासरची माणसे छळतील या भीतीने एका पुनर्विवाहास लोकहितवादी उपस्थित राहिले नाहीत.

'प्रभाकर' पत्राचे संपादक भाऊ महाजन आणि दादोबा पांडुरंग यांच्यासारख्या मुंबईच्या काही बुद्धिमंतांनी 'परमहंस सभा' नावाच्या गुप्त संघटनेची स्थापना केली. या संघटनेच्या महाराष्ट्रातील अनेक शहरांत शाखा होत्या या संघटनेचे सुमारे एक हजार सभासद होते आणि ते जातिभेद पाळीत नसत. मात्र वाळीत टाकले जाण्याच्या भीतीमुळे जातिव्यवस्थे-विरुद्ध उघडउघड बंड करणे त्यांना शक्य नव्हते. १८६० नंतर एका सभासदाने या गुप्त

संघटनेच्या सभासदांची यादी चोरली व या या दीतील नावे प्रसिद्ध केली तेव्हा या संघटनेतील बहुतेक सभासदांनी अंग काढून घेतले.

बंगालमधील सुधारणेच्या चळवळीचा एकोणिसाव्या शतकातील मुंबई इलाख्यातील बुद्धिमंतांवर बराच प्रभाव पडला होता. मुंबईच्या भेटीत केशवचंद्र सेन यांनी दिलेल्या व्याख्यानामुळे ३१ मार्च १८६७ रोजी प्रार्थनासमाजाची स्थापना करण्याच्या उपक्रमास चालना मिळाली असे दिसते. रामकृष्ण गोविंद भांडारकर (१८३७–१९२५) हे प्रार्थना समाजाचे एक आघाडीचे सभासद होते. काही फेरफार करून बंगालमधील ब्राह्मो समाजाकडून प्रार्थना समाजाने मूलभूत तत्त्वे स्वीकारली होती असे भांडारकर यांनी मान्य केले आहे. मात्र केशवचंद्र सेन यांचे खिरस्ती धर्मियांच्या मुशीत ओतलेले विचार तसेच खिरस्ती धर्मियांची सहानुभूती मिळविण्याचे व तिची कदर करण्याचे केशवचंद्रांचे प्रयत्न प्रार्थना समाजाच्या नेत्यांना आवडले नव्हते. महादेव गोविंद रानडे यांना लिहिलेल्या पत्रात भांडारकर म्हणतात, " ब्राह्मो समाजातील केशवचंद्र सेन यांच्या गटाच्या भावना व कृती यांच्यामध्ये आक्षेप घेण्यासारखे बरेच आहे असे मला वाटते. याउलट आंतरजातीय विवाह घडवून आणण्यासाठी तसेच जातपात मोडण्यासाठी उत्तेजन देणे हे आपले काम नाही असे देवेंद्रांचा ( देवेंद्रनाथ टागोर ) गट समजतो. "

प्रार्थना समाजाचे सभासद मूर्तिपूजा करीत नसत. परमेश्वराची प्रार्थना करण्यावर त्यांचा विश्वास होता. प्रत्यक्ष परमेश्वराचा शब्द म्हणून कोणत्याही धर्मग्रंथास मान्यता देण्यास अगर त्याची पूजा करण्यास ते तयार नव्हते. सर्व माणसे ही ईश्वराची लेकरे अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे जातिभेद मानण्यास त्यांनी नकार दिला.

' इंदुप्रकाश ' या वृत्तपत्राचे संपादक व कडवे समाजसुधारक विष्णु परशुराम पंडित यांनी हाती घेतलेल्या विधवाविवाहाच्या चळवळीस भांडारकर व रानडे या दोघांनीही साहाय्य केले. विधवाविवाहास काही प्राचीन स्मृतिग्रंथांनी मुभा दिली होती हे सिद्ध करण्यासाठी १८७० च्या मार्च महिन्यात शंकराचार्यांच्या उपस्थितीत एक जाहीर वाद झाला. या वादाचा निर्णय देण्यासाठी नेमलेल्या तज्ज्ञ पंचांनी मात्र सुधारकांच्या विरुद्ध निकाल दिला. त्यामुळे नाउमेद न होता विष्णुशास्त्री पंडित यांनी १८९४ साली एका विधवेशी विवाह करण्याचे धैर्य दाखवून उदाहरण घालून दिले. मात्र त्यांचे बरेचसे पाठीराखे प्रायश्चित्त घेऊन शंकराचार्यांना निमूटपणे शरण गेले.

वरिष्ठ जातीतील या सुधारकांनी कुटुंबसंस्था व विवाहसंस्था या सामाजिक संस्था सुधारण्यावर अधिक लक्ष केंद्रित केले होते. या उलट जोतिराव गोविंदराव फुले (१८२७ –१८९० ) यांनी अन्याय्य जातिव्यवस्थेवर जोरदार हल्ला चढवला. अस्पृश्यांचे व स्त्रियांचे हक्क हिरावून घेणाऱ्या किंवा संकुचित करणाऱ्या हिंदू धर्मग्रंथांचा व कायद्यावरील भाष्यांचा त्यांनी निषेध केला. ' गुलामगिरी ' या शीर्षकाच्या पुस्तकात त्यांनी ब्राह्मणांच्या वर्चस्वाचा इतिहास विशद केला. ब्राह्मणांची स्वार्थी व निष्ठुर वृत्ती, धूर्तपणाने हिंदुस्थानावर आजवर

त्यांनी गाजवलेली हुकमत यांचे वर्णन कितीही कठोर भाषेत केले तरी ते अपुरेच ठरेल असे त्यांनी स्पष्ट शब्दांत सांगितले. २४ सप्टेंबर १८७३ रोजी त्यांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. या संघटनेच्या सर्व सभासदांनी ब्रिटिश साम्राज्याला एकनिष्ठ राहण्याची तसेच कोणत्याही मध्यस्थाशिवाय देवाला—निर्मिकाला भजण्याची शपथ घेतली होती. शूद्रातिशूद्रांना ब्राह्मणांच्या पकडीतून मुक्त करणे हा त्यांचा उद्देश होता. ख्रिस्ती धर्मोपदेशक हे फुले यांचे मार्गदर्शक होते असा त्या काळात सार्वजनिक समज असला तरी ' वज्रसूची '-सारख्या संस्कृत ग्रंथाने किंवा प्रसिद्ध संतकवी कबीर यांच्या बीजग्रंथाने त्यांना अधिक प्रेरणा मिळाली होती असे दिसते.

सामाजिक बहिष्काराचे परिचित शस्त्र परिणामकारकरीत्या वापरून १८१८ ते १८७३ या कालखंडात कर्मठ ब्राह्मणांनी तसेच परंपरानिष्ठ मंडळींनी या साऱ्या सुधारणेच्या चळवळींवर तुटून पडण्याचा सतत प्रयत्न केला. तरीही हिंदुधर्म व हिंदूंचा सांस्कृतिक वारसा यांची हेटाळणी करणाऱ्या ख्रिस्ती धर्मोपदेशकांविरुद्ध तसेच हिंदुसमाजसुधारकांविरुद्ध मनातला संताप व्यक्त करणाऱ्या कोणातरी माणसाची त्यांना आवश्यकता वाटत होती. त्यासाठी १८७४ सालच्या जानेवारीमध्ये विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची निबंधमाला सुरू होईपर्यंत त्यांना वाट पाहावी लागली. जिव्हारी लागणारा विनोद आणि बोचरा उपहास यांच्या साहाय्याने त्यांनी सर्व समाजसुधारकांची टवाळी व हेटाळणी केली. म्हणूनच निबंधमालेचे प्रकाशन हा केवळ मराठी वाङ्मयाच्या इतिहासातीलच नव्हे तर एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राच्या इतिहासातील एक मोठा टप्पा मानला जातो.



# २ : जडणघडण

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा जन्म पुणे येथे २० मे १८५० रोजी झाला. इतर चित्पावन किंवा कोकणस्थ ब्राह्मणांप्रमाणे चिपळूणकर कुटुंबही कोकणातून देशावर आले. हे घराणे मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील पावस या गावचे ! विष्णुशास्त्री यांचे आजोबा हरिपंत हे दुसऱ्या बाजीराव पेशव्याचा धाकटा भाऊ चिमणाजी अप्पा याची चाकरी करीत असत. १८१८ साली पेशव्यांचा पराभव झाल्यानंतर हरिपंतांना अफू विकून उदरनिर्वाह करावा लागला. हरिपंतांचे थोरले चिरंजीव कृष्णशास्त्री यांचा जन्म १८२४ साली झाला. सीताराम हा हरिपंतांचा धाकटा मुलगा. १८५२ साली जन्मलेला. म्हणजे विष्णुशास्त्री या आपल्या पुतण्यापेक्षा दोन वर्षांनी लहान होते. कृष्णशास्त्री व सीताराम हे दोघेही हरिपंतांचे चिरंजीव मोठेपणी महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनात विख्यात झाले. कृष्णशास्त्री हे लेखक व पंडित म्हणून नावाजले गेले तर सीतारामपंत सार्वजनिक सभेचे चिटणीस व ' ज्ञान-प्रकाश ' पत्राचे संपादक म्हणून गाजले.

अफाट स्मरणशक्ती व कुशाग्र बुद्धिमत्ता या गुणामुळे कृष्णशास्त्री यांनी लहान वयातच नामवंत पंडितांवर छाप पाडली. त्यांचे ख्यातनाम शिक्षक मोरशास्त्री साठे, कृष्णशास्त्री यांना कौतुकाने ' बृहस्पती ' म्हणत असत. कृष्णशास्त्री यांनी वेद, उपनिषदे, संस्कृत व्याकरण व विशेषतः न्यायशास्त्राचे सूक्ष्म अध्ययन केले आणि अध्ययन संपल्यानंतर त्याच पाठशाळेत संस्कृत शिकविण्यास त्यांनी सुरवात केली. मोरशास्त्री साठे या गुरुजींच्या सल्ल्यानुसार कृष्णशास्त्री यांनी वयाच्या चोविसाव्या वर्षी इंग्रजी भाषा व साहित्य यांचा अभ्यास सुरू केला. काही वर्षांनी भारतीय तसेच इंग्रजी साहित्याचे गाढे अभ्यासक म्हणून त्यांचा नावलौकिक झाला. एडविन अर्नोल्ड हे पुण्याच्या महाविद्यालयाचे काही वर्षे प्राचार्य होते. १९०१ साली जे. एन. फ्रेझर या डेक्कन कॉलेजमधील प्राध्यापकांना लिहिलेल्या पत्रात त्या दिवसांच्या आठवणी सांगताना अर्नोल्ड यांनी लिहिले, " तेव्हा सुमारे चारशे विद्यार्थी होते. त्यांत केरू लक्ष्मण ( छत्रे ) व कृष्णशास्त्री चिपळूणकर हे दोघे फार हुशार विद्यार्थी होते. " कृष्णशास्त्री यांच्या बुद्धीची झेप आणि त्यांचा चौफेर व्यासंग पाहून त्यांच्या सम-कालिनांना नवल वाटत असे.

इ. स. १८५० ते १८७८ या काळात कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी मुंबई इलाख्यात विविध अधिकारपदे भूषविली. १८५२ साली भाषांतरकार म्हणून त्यांची नेमणूक करण्यात

आली. लवकरच पुण्याच्या महाविद्यालयात मराठीचे सहायक प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. लेखकांना पारितोषिके देणाऱ्या दक्षिणा पारितोषिक समितीचे चिटणीस म्हणून १८५९ साली त्यांना नेमण्यात आले. हे महत्त्वाचे पद १८६५ सालपर्यंत त्यांनी भूषविले. १८६५ ते १८६८ पर्यंत पुण्याच्या महाविद्यालयाच्या प्राचार्यपदाची धुरा वाहिल्यानंतर मुंबई सरकारने त्यांना देशी भाषेतील वृत्तपत्रांतील महत्त्वाच्या बातम्या व लेखांचे इंग्रजी भाषांतर करण्याचे काम करण्यासाठी नेमले. १८७८ साली त्यांचे निधन होईपर्यंत कृष्णशास्त्री हेच अधिकारपद भूषवीत होते. त्या काळात भारतीयांची उच्च अधिकारपदावर नेमणूक करावयाची नाही असे इंग्रज राज्यकर्त्यांचे धोरण असतानाही त्या वेळी उच्च व प्रतिष्ठेच्या समजल्या जाणाऱ्या अधिकारपदांपैकी काही कृष्णशास्त्री यांच्या वाट्याला आली हे लक्षात ठेवावयास हवे.

कृष्णशास्त्री यांना सरकारी नोकरीत मिळालेल्या बढत्यांमुळे चिपळूणकर कुटुंबाची आर्थिक स्थिती खूपच सुधारली. हे कुटुंब आता गरीब राहिले नाही. त्यामुळे वडिलांच्याप्रमाणे विष्णुशास्त्री यांना दारिद्र्याशी सामना करावा लागला नाही. सरकारी नोकरीत यश मिळवीत असताना दीर्घोद्योगी लेखक म्हणूनही कृष्णशास्त्री यांनी नाव कमावले. मात्र त्यांचे बहुतेक प्रकाशित लेखन हे मूळ इंग्रजी ग्रंथांचे भाषांतर अगर रूपांतर होते. त्यांनी सॉक्रेटिसचे चरित्र लिहिले तसेच अर्थशास्त्रासंबंधीही एक पुस्तक लिहिले. ' अनेक विद्यामूलतत्त्व संग्रह ' या त्यांच्या पुस्तकात विविध शास्त्रीय विषयांवरच्या माहितीपूर्ण लेखांचा समावेश होता. ' मॅककलॉक्स कोर्स ऑफ रीडिंग ' या मूळ इंग्रजी पुस्तकावर कृष्णशास्त्री यांचे हे पुस्तक मुख्यतः आधारलेले होते. मात्र त्यात ताजमहाल तसेच वेरूळची लेणी यासारख्या विषयांवरच्या लेखांची कृष्णशास्त्री यांनी भर घातली होती. त्यांनी काही पदे रचली होती तसेच मराठी व्याकरणासंबंधी लेखमाला लिहिली होती. मात्र आजही त्यांची आठवण होते ती त्यांनी ' अरेबियन नाइट्स ' या इंग्रजी पुस्तकाच्या ' अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ' या नावाने केलेल्या अनुवादामुळे !

आपल्या काही समकालीनांप्रमाणे कृष्णशास्त्री यांचाही सामाजिक सुधारणेस पाठिंबा देण्याकडे कल होता. मात्र त्यामुळे सामाजिक बहिष्कारास तोंड देण्याचा प्रसंग आला की ते कच खात असत. कर्मठ ब्राह्मणांच्या दडपणाला ते मान तुकवीत आणि प्रायश्चित्तादाखल त्यांनी सांगितलेले धर्मविधी निमूटपणे करून मोकळे होत असत. कृष्णशास्त्री नास्तिक आहेत हे त्यांचे नातेवाईक व मित्र यांना माहीत होते. ते वृत्तीने रंगेल व बाहेरख्याली होते हेही त्यांना माहीत होते. गैरवर्तनाबद्दल सरकारने त्यांना एकदा निलंबित केले होते पण काही वजनदार इंग्रज अधिकाऱ्यांनी त्यांच्या वतीने रदबदली केल्यामुळे त्यांची नोकरी चालू राहिली. ' विचारलहरी ' नावाचे एक नियतकालिक चालविणाऱ्या मंडळींशी त्यांचा घनिष्ट संबंध होता. या नियतकालिकाद्वारा खिरस्ती धर्मोपदेशकांविरुद्ध मोहीम चालवली जात असे. हे नियतकालिक वैदिक धर्म आणि तत्त्वज्ञान यांची तरफदारी करीत असे. या कारणा-

मुळे खरे म्हणजे कृष्णशास्त्री चिपळूणकर यांना काही काळ निलंबित करण्यात आले होते अशी त्या काळात अनेकांची समजूत होती.

चारित्र्याच्या दृष्टीने कृष्णशास्त्री यांच्यात काही दोष असले तरी त्यांचे पुत्र विष्णुशास्त्री यांना वडिलांच्याविषयी फार प्रेम होते. तसेच आदरही वाटत होता. वडिलांचा सुखोपभोगावर भर देणारा आयुष्यक्रम त्यांना कधीच आवडला नाही. मात्र इतर कोणी वडिलांच्या बाहेरख्याली रंगेल जीवनाबद्दल टवाळी केली तर अशा माणसास विष्णुशास्त्री कधीच क्षमा करीत नसत. कृष्णशास्त्री यांच्या विरोधकांवर निष्ठुर हल्ला चढविण्याची कोणतीही संधी विष्णुशास्त्री वाया घालवीत नसत. वडिलांच्याप्रमाणे विष्णुशास्त्री यांचे वाचनही अफाट होते आणि वडिलांच्याप्रमाणे तेही संस्कृत व मराठी भाषांचे व साहित्याचे भक्त होते.

बालपणी मात्र विष्णुशास्त्री यांच्यावर त्यांचे आजोबा हरिपंत व आजी भागिरथीबाई यांचा जास्त प्रभाव पडलेला होता. हे जोडपे धर्मनिष्ठ, ईश्वरावर श्रद्धा असलेले व प्रामाणिक होते. आपल्या मुलाचे बाहेरख्याली रंगेल जीवन त्यांना मुळीच रुचत नसे पण ते बदलणे त्यांच्या हाती नव्हते. विष्णुशास्त्री व लक्ष्मणराव वगैरे नातवंडांना त्यांनी फार जपले आणि आजी-आजोबांची माया दोघेही नातू कधीच विसरू शकले नाहीत हे लक्ष्मणरावांनी लिहिलेल्या आपल्या मोठ्या भावाच्या-विष्णुशास्त्री यांच्या चरित्रावरून स्पष्ट दिसते. त्यांच्या समकालीनांमध्ये पानतंबाखू खाण्याचे व्यसन फार बोकाळले होते. पण मुख्यतः आजी-आजोबांच्या प्रभावामुळे विष्णुशास्त्री व लक्ष्मणराव यांना पानतंबाखूचेच काय दुसरे कोठलेही व्यसन लागले नाही. वडिलांची व्यसनांच्या आहारी जाण्याची वृत्ती लक्षात घेता या दोघा बंधूंच्या निर्व्यसनी आयुष्यक्रमातील फरक तुलनेने विशेष जाणवतो.

हरिशास्त्री पंडित नावाचे साताऱ्याचे एक विद्वान ब्राह्मण पुण्याला आले की कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या घरी मुक्काम करीत असत. लहानपणी विष्णुशास्त्री यांच्या संवेदनाक्षम मनावर हरिशास्त्री पंडितांचीही छाप पडली होती. पेशवाईतील अखेरच्या वर्षातील घटनांच्या कहाण्या हरिशास्त्री पंडितांच्या तोंडून ऐकण्यात विष्णुशास्त्री यांना काळवेळाचे भान राहात नसे. गेलेल्या दिवसांच्या आठवणी सांगताना हरिशास्त्री पंडितही रंगून जात असत. गोष्टी सांगण्याचे विलक्षण कसब हरिशास्त्री यांना अवगत होते. या कहाण्या ऐकण्यात विष्णुशास्त्री दंग होत असत. त्यांचे बंधू व चरित्रकार लक्ष्मणराव यांच्या मते विष्णुशास्त्री यांच्या मनात देशभक्तीचे बीज पेरले गेले ते हरिशास्त्री यांनी सांगितलेल्या या अविस्मरणीय गोष्टींमुळे! मराठ्यांच्या उज्ज्वल इतिहासाबद्दल आणि पेशव्यांच्या पराक्रमाबद्दल लिहिताना मोठेपणी विष्णुशास्त्री यांना जो अभिमान वाटत असे त्याच्या मुळाशी हरिशास्त्री पंडितांनी सांगितलेल्या चित्तवेधक हकीकती होत्या असे वाटते.

विद्यार्थी म्हणून विष्णुशास्त्री फार तैलबुद्धीचे आहेत असे त्यांच्या शिक्षकांना कधी वाटले नाही. मात्र ते अभ्यासू आहेत आणि नियमाने वर्गात हजर असतात हे त्यांच्या तेगुरुजींना माहीत हो. जात्याच त्यांचा स्वभाव लाजाळू, बुजरा होता. आपल्या सहाध्यायांनी

वर्गात चालवलेली चेष्टामस्करी व हुल्लड ते शांतपणे पाहात असत. पुण्याच्या सरकारी हायस्कुलात त्यांना शिकवणाऱ्या मंडळींमध्ये चिमणाजी महादेव या शिक्षकांना ते कधी विसरले नाहीत. ऑलिव्हर गोल्डस्मिथची ' द डेझर्टेड व्हिलेज ' ही कविता बिनचूक म्हणून दाखवल्या-बद्दल विष्णुशास्त्री यांना या शिक्षकानेच बक्षीस दिले होते. संस्कृत भाषा व साहित्य यांची त्यांना गोडी लागली ती कृष्णशास्त्री विजापूरकर या त्यांच्या शाळेतील शिक्षकामुळे ! कृष्ण-शास्त्री विजापूरकरांचे व कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे संबंध कधीच सलोख्याचे नव्हते. तरीही विष्णुशास्त्री यांचे विजापूरकरांबरोबर चांगले जमत असे आणि आयुष्यभर या गुरुजींबद्दल त्यांना आदर वाटत असे.

इ. स. १८६५ मध्ये विष्णुशास्त्री मुंबई विद्यापीठाच्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेत उत्तीर्ण झाले. त्याच सालच्या सप्टेंबर महिन्यात त्यांचे आजोबा हरिपंत कालवश झाले. त्यानंतर तीन महिन्यांनी म्हणजे १८६५ च्या डिसेंबर महिन्यात काशीबाई गोगटे यांच्याशी विष्णुशास्त्री यांचा विवाह साजरा झाला. वडिलांनी त्यांचे हे लग्न जमवले तेव्हा विष्णुशास्त्री यांच्या वयाला सोळा वर्षेही पुरी झाली नव्हती. त्या काळात रूढ असलेल्या बालविवाहाच्या पद्धतीस हे धरूनच होते.

इ. स. १८६६ मध्ये विष्णुशास्त्री पुढील शिक्षणासाठी डेक्कन कॉलेजमध्ये दाखल झाले. तेथे ते पाच वर्षे होते. त्यांचे धाकटे भाऊ लक्ष्मणराव यांच्या मते हा पाच वर्षांचा काळ म्हणजे विष्णुशास्त्री यांच्या आयुष्यातील सर्वांत सुखाचा काळ होता. डेक्कन कॉलेजमध्ये तेव्हा अवघे पासष्ट विद्यार्थी होते. त्यामुळे प्राध्यापकांना प्रत्येक विद्यार्थ्याकडे जातीने लक्ष देता येत असे. खेरीज बहुतेक सर्व विद्यार्थी वसतिगृहात राहात असल्यामुळे सहज निर्माण झालेले समानशील मित्रांबरोबरचे त्यांचे घनिष्ट स्नेहसंबंध आयुष्यभर टिकून राहात. १८६८ पर्यंत डेक्कन कॉलेजला स्वतंत्र इमारत नव्हती. १८६६ पर्यंत कॉलेजचे वर्ग पेशव्यांच्या विश्रामबाग वाड्यात भरत, तर १८६७ साली वानवडी येथे भाड्याने घेतलेल्या एका बंगल्यात वर्ग भरत असत. सध्या जेथे डेक्कन कॉलेजची इमारत आहे ती १८६८ साली बांधली गेली. ही वास्तू शहरापासून बरीच दूर तर होतीच. आवतीभोवतीचे वातावरणही निसर्गरम्य होते. कॉलजचे विद्यार्थी बरेच लांब फिरायला जात असत. कॉलेजशेजारच्या मुळा नदीत ते पोहतही असत.

प्राचार्य विल्यम वर्डस्वर्थ व केरूनाना छत्रे यांच्यासारखे नामवंत पंडित आणि उत्तम शिक्षक या काळात डेक्कन कॉलेजमध्ये शिकवीत होते. प्राचार्य वर्डस्वर्थ हे विख्यात इंग्रज कवी विल्यम वर्डस्वर्थ यांचे नातू होते. ते साहित्य व इतिहास शिकवीत असत. त्यांची धार्मिक, शैक्षणिक व प्रशासनाबद्दलची मते अनेक इंग्रजांना रुचत नसत. एखाद्या इंग्रज लेखकाने हिन्दुस्थानातील लोकांवर कडक टीका केली की वर्डस्वर्थसाहेब भारतीयांच्या मदतीला धावून येत आणि येथील लोक व त्यांची संस्कृती सहानुभूतिपूर्वक समजावून घेतली पाहिजे असे ते आपल्या देशवासीयांना सांगत असत. भारताचे मित्र असा जरी

त्यांचा लौकिक असला तरी त्यांच्या विद्यार्थ्यांना त्यांच्याविषयी प्रेम वाटण्यापेक्षा त्यांची भीतीच जास्त वाटत असे. तापट स्वभावामुळे वर्डस्वर्थ साहेब वारंवार भडकत असत आणि रागाच्या भरात विद्यार्थ्यांना ते 'मूर्ख' किंवा 'मठ्ठ' म्हणत असत. त्यांच्या व्याख्यानात ते जाणूनबुजून विषयांतर करीत असत, त्यामागे विद्यार्थ्यांना निरनिराळ्या विषयांवर लिहिल्या जाणाऱ्या उत्कृष्ट ग्रंथांची, तसेच सतत वाढत चाललेल्या ज्ञानाची जाणीव करून देण्याचा त्यांचा उद्देश असे.

बिशप बटलर यांच्या 'सर्मन्स' (प्रवचने) या पुस्तकाचा स्वेच्छेने अभ्यास करावयाच्या विषयामध्ये त्या काळात समावेश करण्यात आला होता. अभ्यासासाठी हे पुस्तक फक्त पाच विद्यार्थ्यांनी निवडले होते. विष्णुशास्त्री हे त्या पाच विद्यार्थ्यांपैकी एक होते. बिशप बटलर यांच्या पुस्तकातील चौदा 'सर्मन्स'पैकी फक्त तीन परीक्षेला नेमलेली होती. त्यामुळे विष्णुशास्त्री यांच्या एका वर्गबंधूने उरलेली अकरा वाचावयाची का असा वर्डस्वर्थसाहेबांना प्रश्न विचारताच ते उसळले आणि त्या विद्यार्थ्याला म्हणाले, "एखाद्या भाडोत्री इसमासारखा तू सांगकाम्या दिसतोस! घोकंपट्टी करून पास होण्याखेरीज दुसरे अधिक चांगले उद्दिष्ट तू मनात ठेवलेलेच नाहीस का?" ज्ञानोपासनेविषयीचा वर्डस्वर्थसाहेबांचा दृष्टिकोण विष्णुशास्त्री यांना आवडला आणि डेक्कन कॉलेजमधील पाच वर्षांच्या वास्तव्यात तेथील ग्रंथालयातील सर्व प्रकारची पुस्तके त्यांनी नजरेखाली घातली.

त्यांचे वाचन जबरदस्त होते. मात्र पहिल्या पानापासून ते शेवटच्या पानापर्यंत कोणतेही पुस्तक ते क्वचितच काळजीपूर्वक वाचीत असत. अनेक पुस्तके चाळणे आणि त्यांचा आशय जलदीने समजावून घेणे असा त्यांचा खाक्या होता. संस्कृत, मराठी व इंग्रजी ग्रंथ ते वाचीत असत. त्यातही विशेषतः काव्य व नाटक हे वाङ्मयप्रकार त्यांना विशेष आवडत असत. इतिहासाकडेही त्यांचा फार ओढा होता. माणूस आणि त्याची स्थिती समजावून घेण्यात त्यांना मूलतः रस होता, त्यामुळे अमूर्त संकल्पनांच्या अभ्यासाबाबत त्यांना कधी आस्था वाटली नाही.

इंग्रजी, संस्कृत व मराठी या भाषांवर त्यांचे प्रेम होते. गणित व तर्कशास्त्र हे विषय मात्र त्यांना कधी आवडले नाहीत. १८६७ सालच्या वार्षिक परीक्षेत गणितात नापास झाल्याने त्यांना डेक्कन कॉलेजमधील आपला मुक्काम एक वर्षाने वाढवावा लागला होता. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे जिवलग मित्र केरूनाना छत्रे हे डेक्कन कॉलेजमध्ये गणित शिकवीत असत. सबंध मुंबई इलाख्यात गणित शिकविण्यात हातखंडा असलेल्या शिक्षकांमधले ते सर्वोत्कृष्ट व विद्यार्थीप्रिय शिक्षक होते. केरूनानांच्या वर्गात विष्णुशास्त्री नेमाने हजेरी लावीत असत, मात्र त्यांच्या मनात गणित विषयाबाबत कधीच आवड निर्माण झाली नाही. एकदा वार्षिक परीक्षेत गोता खाल्ल्यानंतरही गणित व तर्कशास्त्र या विषयांच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष करणे त्यांनी चालूच ठेवले. वॉल्टर स्कॉटच्या कादंबऱ्या वाचण्यात ते बराच वेळ खर्ची घालत असत. १८६८ सालच्या पूर्वपरीक्षेत ते तर्कशास्त्र विषयात उत्तीर्ण

झाले नाहीत तेव्हा कृष्णशास्त्री मुलाला तर्कशास्त्र शिकवण्यास तयार झाले तरच विष्णुशास्त्री यांना वार्षिक परीक्षेस बसू देण्याची परवानगी मिळेल असे वर्डस्वर्थसाहेबांनी कृष्णशास्त्री यांना कळवले होते.

विष्णुशास्त्री यांच्या संस्कृत व मराठी साहित्यावरील प्रभुत्वामुळे या विषयांच्या प्राध्यापकांची मात्र त्यांच्यावर मर्जी असे. मराठी भाषा व साहित्य यातल्या गतीबद्दल त्यांनी कँडीसाहेबांच्या नावाने दिली जाणारी शिष्यवृत्तीही एकदा पटकावली होती. डेक्कन कॉलेजातील वादविवादमंडळातर्फे दर आठवड्यात एकदा वादविवाद घडवून आणला जात असे. सभाधीटपणा अंगी नसल्याने विष्णुशास्त्री यांनी वादविवादात कधीच भाग घेतला नाही. पुढे त्यांनी निबंधमालेत 'वक्तृत्व' या विषयावर एक विस्तृत निबंध लिहिला होता. तो वक्ता म्हणून स्वतःला आलेल्या अनुभवापेक्षा रसिक श्रोता म्हणून त्यांनी घेतलेल्या आस्वादावरच आधारलेला होता. दोन-तीन प्रसंगी विद्यार्थ्यांसमोर त्यांनी निबंध मात्र वाचून दाखवले होते असे म्हणतात, यांपैकी एका निबंधात त्यांनी पृथ्वी सूर्यावर अवलंबून आहे हे प्राचीन हिंदूंना माहीत होते याबद्दल त्यांची प्रशंसा केली होती. विष्णुबुवा ब्रह्मचारी या संन्याशाने 'वेदोक्त धर्म प्रकाश' नावाचा हिंदू धर्माची तरफदारी करणारा ग्रंथ लिहिला होता. या ग्रंथात त्यांनी उल्लेखिलेल्या वेदातील ऋचा विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी आपल्या निबंधातील युक्तिवादाच्या पुष्टीदाखल उद्धृत केल्या होत्या. वेदकाळातील आर्यांचे यश व पराक्रम आणि भारताचा संपन्न सांस्कृतिक वारसा याबद्दल विष्णुशास्त्री यांना विद्यार्थी असल्यापासूनच अतीव आदर व विस्मय वाटत होता हे यावरून स्पष्ट दिसते.

विष्णुशास्त्री यांचे चुलते सीतारामपंत यांच्याजवळ जसे संभाषणकौशल्य होते तसे विष्णुशास्त्री यांच्याजवळ नव्हते. मित्रांच्या मैफलीतही चर्चेत भाग घेण्यापेक्षा आपल्या स्नेह्यांचे बोलणे शांतपणे ऐकणे हेच विष्णुशास्त्री यांना अधिक पसंत असे. जाहीर सभेला ते हजर राहात तेव्हाही समोरच्या रांगेत बसण्यापेक्षा श्रोत्यांमध्ये अगदी मागे बसणे त्यांना आवडत असे. माणसांत सहज मिसळण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. तरीही विष्णुशास्त्री डेक्कन कॉलेजमध्ये असताना वि. मो. महाजनी हे नामवंत लेखक तसेच श्रीधर गणेश जिनसीवाले हे संस्कृतचे गाढे अभ्यासक आणि त्या काळातील एक विलक्षण लोकप्रिय वक्ते यांच्यासारख्या मंडळींची त्यांच्या मित्रमंडळीत गणना होत असे हे लक्षात ठेवले पाहिजे.

इ. स. १८७० मध्ये विष्णुशास्त्री बी. ए. च्या परीक्षेत उत्तीर्ण झाले नाहीत गणित हा विषय पुन्हा एकदा त्यांच्या मार्गातील अडथळा ठरला. १८७१ सालाच्या अखेरीस होणाऱ्या परीक्षेसाठी घरी राहून अभ्यास करण्याचे त्यांनी ठरवले. मात्र लवकरच कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे स्नेही बाबा गोखले यांच्या खासगी शाळेत त्यांनी शिक्षकाची नोकरी पत्करली. गोखले हे स्वतः उत्तम शिक्षक होते पण शाळेत शिस्त राखणे त्यांना जमत नसे. त्यामुळे त्यांच्या शाळेतील विद्यार्थी दंगेखोरपणाबद्दल गाजले होते. आधीच शाळेचा कारभार

ढिला! वर्गावर वारंवार उशिरा जाऊन विष्णुशास्त्री यांनी शाळेतल्या मूळच्याच बेशिस्त वातावरणात अधिक भर घातली. त्या काळात शिक्षक छडीचा सारखा वापर करीत असत. मात्र 'छडी लागे छमछम विद्या येते घमघम' यावर विष्णुशास्त्री यांचा विश्वास नव्हता. त्यामुळे ते छडी वापरीत नसत. अर्थातच दंगेखोर विद्यार्थी त्यांना हैराण करीत. खरे म्हणजे शिक्षकाचा पेशा त्यांना आवडत असे. पण बाबा गोखले यांच्या शाळेतल्या वातावरणामुळे शिकविण्यातला आनंद त्यांना कधीच अनुभवता आला नाही. दुसऱ्या चांगल्या शाळेत नोकरी मिळेपर्यंत वाट पाहण्याखेरीज त्यांना गत्यंतर नव्हते. १८७१ सालापासून डेक्कन कॉलेजच्या विद्यार्थ्यांची वार्षिक स्नेहसंमेलने होऊ लागली. या उत्सवप्रसंगी संस्कृत नाटकाचा प्रयोग करण्याचा प्रघात पडला. विष्णुशास्त्री यांच्या काही स्नेह्यांनी 'वेणीसंहार' या प्रसिद्ध संस्कृत नाटकाचा प्रयोग करण्याचे ठरविले तेव्हा पदवीपरीक्षेच्या अभ्यासात मग्न असतानाही या नाटकात धर्मराजाची भूमिका करण्यासाठी विष्णुशास्त्री यांनी सवड काढली.

अठराशेबहात्तर सालच्या सुरवातीस विष्णुशास्त्री यांनी बी. ए. ची पदवी मिळविली. त्यानंतर आपल्या आवडीच्या विषयांचे वाचन करण्यास व त्यासंबंधी लिहिण्यास ते पूर्ण मोकळे झाले. त्यांचे वडील कृष्णशास्त्री हे त्या वेळी 'शालापत्रक' या नियतकालिकाचे संपादक होते. शिक्षण खात्याचे संचालक हे नियतकालिक प्रसिद्ध करीत असत. विशेषतः ग्रामीण भागातील शिक्षकांना मार्गदर्शन करण्यासाठी हे नियतकालिक चालवले जात असे. विष्णुशास्त्री यांनी कृष्णशास्त्री यांच्या बरोबरीने संपादनाच्या जबाबदारीचा वाटा उचलण्यास सुरवात केली. डॉक्टर जॉन्सनच्या 'रासेलस'चे मराठी भाषांतर पुरे करण्यातही विष्णुशास्त्री यांनी वडिलांना मदत केली. शिक्षकाची कर्तव्ये, प्रवासाचे फायदे यासारख्या विषयांवर या नियतकालिकासाठी त्यांनी छोटे निबंधही लिहिले. रोमच्या साम्राज्याच्या इतिहासातील महत्त्वाच्या घटनांचे त्यांनी वेधक वर्णन केले. त्यांनी काही पुस्तकांची परीक्षणेही केली. त्यामध्ये कालीदासाच्या 'कुमारसंभवम्' नाटकाचे मराठी भाषांतर तसेच नौकानयनाच्या इतिहासावरील एक पुस्तक यांचाही समावेश होता.

काव्याविषयी विशेषतः कालीदास, भवभूती, बाणभट्ट, सुबंधू व दंडी यांच्याविषयी विष्णुशास्त्री यांनी लिहिलेल्या लेखमालेमुळे त्यांच्या समकालीनांचे त्यांनी प्रथम लक्ष वेधून घेतले इंग्रजी काव्याच्या विकासाचा थोडक्यात मागोवा घेऊन त्यांनी या पाच संस्कृत कवींच्या मुख्य काव्यग्रंथांचे गुण दाखवून त्यावर भाष्य केले. मराठी कवींनी जी भर टाकली तिचेही मूल्यमापन करण्याची त्यांची मूळची योजना होती. पण १८७० सालच्या अखेरीस शालापत्रकाचे प्रकाशन बंद करण्याचा सरकारने निर्णय घेतल्याने मराठी कवींबद्दलची योजिलेली लेखमाला त्यांना पुरी करता आली नाही. मुंबई सरकारचा निर्णय शिक्षण संचालकांनी कृष्णशास्त्री चिपळूणकर यांना २१ ऑक्टोबर १८७५ रोजी पत्र लिहून कळवला. या पत्रात त्यांनी लिहिले होते, "१८ तारखेच्या आपल्या पत्रास हे

उत्तर लिहीत आहे. या वर्षअखेर मराठी शालापत्रक छापणे बंद करावे. सरकारी किंवा खाजगी स्थानिक शाळांकडून येणे असलेल्या वर्गणीची बिले तयार करून ती शक्य तितक्या लवकर सादर करावीत. '' मध्ययुगीन मराठी कवींबद्दलच्या खिस्ती धर्मोपदेशकांच्या टीकेचे विष्णुशास्त्री यांनी खंडन केल्यापासून चिडल्या गेलेल्या खिस्ती धर्मोपदेशकांनी दडपण आणल्यामुळे सरकारने शालापत्रक बंद करण्याचा निर्णय घेतला असा त्या काळात समज होता.

पाच संस्कृत कवींबद्दल शालापत्रकात लिहिलेल्या त्यांच्या निबंधांत आवश्यक त्या सुधारणा करून त्यांनी या लेखांचा संग्रह ' संस्कृत कविपंचक ' या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला. या पुस्तकात त्यांच्या शैलीचे व विचारसरणीचे अनेक पैलू स्पष्ट दिसतात. नावडत्या व्यक्तींचा सरळ सरळ नामनिर्देश न करता विष्णुशास्त्री त्यांच्यावर वारंवार टीका करीत असत. त्यांच्या हल्ल्याचे लक्ष्य झालेल्या व्यक्तींचा चेहरामोहरा त्यांच्या समकालीनांना सहज लक्षात येत असे. संस्कृत काव्याचा आपण विशेष अभ्यास केला आहे असा दावा करणाऱ्या काही जर्मन प्राध्यापकांच्या उथळ ज्ञानाची त्यांनी आपल्या पुस्तकात हजेरी घेतली होती. मार्टिन हॉग व फ्रांझ कीलहॉर्न हे दोघे जर्मन त्या काळात डेक्कन कॉलेजमध्ये संस्कृत शिकवीत असत. त्यांची विष्णुशास्त्री यांनी आडवळणाने टर उडवली होती. संस्कृत भाषेतील ग्रंथ वाचताना किंवा त्यांचा अन्वयार्थ लावताना पाश्चिमात्य पंडितांनी केलेल्या चुका दाखविताना ते कोणाचा मुलाहिजा न ठेवता कडक टीका करीत असत. संस्कृत भाषेच्या व साहित्याच्या अध्ययनात पाश्चिमात्य पंडित भारतीय पंडितांवर मात करणे शक्य नाही असे त्यांना वाटत असले तरी मॅक्समुल्लर, एच. एच. विल्सन, विल्यम जोन्स यांच्यासारख्या पंडितांच्या निष्ठेचे व व्यासंगी वृत्तीचे त्यांना कौतुक वाटत असे. आपल्या उज्ज्वल भूतकाळाचे पुनर्दर्शन घडविण्यात या पाश्चिमात्य पंडितांनी जे साहाय्य केले त्याबद्दल विष्णुशास्त्री यांना कृतज्ञता वाटत असे. प्राचीन संस्कृत ग्रंथांचा अभ्यास करताना हे पाश्चिमात्य पंडित जी पद्धत वापरीत असत तीही विष्णुशास्त्री वाखाणीत असत. पाश्चिमात्य विद्याविभूषित भारतीय त्या काळात संख्येने मोजके होते. त्यांना असलेल्या न्यूनगंडाचा जाता जाता विष्णुशास्त्री यांनी निर्देश केला आहे. परक्या राज्यकर्त्यांच्या तुलनेने भारतीय कोणत्याही बाबतीत उणे नाहीत आणि कोणत्याही क्षेत्रात इंग्रज राज्यकर्त्यांशी ते तुल्यबल ठरतील असा विश्वास त्यांनी स्पष्ट शब्दांत व्यक्त केला आहे. आयुष्यभर त्यांनी केलेल्या लेखनाचे हे एक मुख्य सूत्र होते.

संस्कृत कवींमध्ये कालीदास व भवभूती या सर्वश्रेष्ठ कवींनी संस्कृत साहित्याचे शिखर गाठले होते असे विष्णुशास्त्री यांना वाटत असे. बाणभट्ट, सुबंधू व दण्डी यांनी पद्यरचना केली नसली तरी हे सर्वजण मनाने कवी असल्याने काव्यात्म भाषा हे त्यांच्या ग्रंथांचे एक वैशिष्ट्य होते असे त्यांचे मत होते. मात्र या तिघांपैकी कोणालाही कालीदास व भवभूती यांची सर नाही असे त्यांचे मत होते. या पाच संस्कृत कवींचे मूल्यमापन करताना त्यांनी त्यांच्या पुस्तकातील अनेक उतारे उद्धृत केले आहेत. संस्कृत साहित्याचे त्यांनी केलेले

सूक्ष्म वाचन, त्यांचे सखोल ज्ञान आणि त्याहीपेक्षा भारताच्या उज्ज्वल सांस्कृतिक संचिताबद्दल त्यांना वाटणारा अभिमान या लेखसंग्रहात स्पष्ट उमटला आहे.

इंग्रजीपेक्षा मराठीत लिहिणे विष्णुशास्त्री यांना आवडत असे. १८७२ साली मात्र 'ज्ञानप्रकाश'मध्ये त्यांचे काही इंग्रजी लेख प्रसिद्ध झालेले आढळतात. त्या काळातील एक प्रसिद्ध वक्ते व विद्वान महादेव मोरेश्वर कुंटे यांच्याबद्दल त्यांनी त्यात उपरोधाने लिहिलेले आढळते. 'राजा शिवाजी' या महाकाव्याचे कर्ते म्हणून कुंटे ओळखले जात होते. या काव्यातील शब्दकळा आणि महाकाव्याला जोडलेली प्रस्तावना यामुळे तेव्हा फार खळबळ उडाली होती. रूढ मतापेक्षा वेगळी मते आणि त्यांचे मुलखावेगळे वागणे यामुळे महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनात कुंटे हे नेहमी वादाचा विषय बनले होते. काव्यक्षेत्रात कुंटे यांनी केलेले प्रयोग बहुतेक समीक्षकांना रुचले नव्हते कारण संस्कृत महाकाव्याचा परिचित घाट बदलण्याचा कुंटे यांचा प्रयत्न सहन करण्याची त्यांची तयारी नव्हती. खेरीज कुंटे हे कृष्णशास्त्री चिपळूणकरांची जाहीररीत्या वारंवार चेष्टा करीत असल्यामुळे विष्णुशास्त्री यांचा त्यांच्याबद्दल व्यक्तिगत आकस होता. ज्ञानप्रकाशमध्ये लेखमाला लिहून विष्णुशास्त्री यांनी कुंटे यांना सणसणीत प्रत्युत्तर दिले.

'तत्त्वज्ञ बनलेला कवी' असे कुंटे यांचे वर्णन करून त्यांच्या जिव्हारी लागेल अशा शब्दांत विष्णुशास्त्री यांनी त्यांच्याविषयी उपहासाने म्हटले, "'पॅरडाईज लॉस्ट' हे महाकाव्य रचण्यास मिल्टनला सहा वर्षे लागली. या महाकाव्याबद्दल इंग्लंडने आता प्रौढी मिरवण्याचे काही कारण नाही हे जाता जाता सांगितले पाहिजे. कारण जवळजवळ तितक्याच म्हणजे सहा वर्षांच्या काळात महाकवी, मुत्सद्दी, सुधारक, वक्ते, तत्त्वज्ञ, भाषाकोविद यांच्या रांगेत अद्वितीय असलेले कुंटे तळपत आहेत. लेखकांच्या इतिहासात या उज्ज्वल कारकीर्दीला तोड नाही. झपाट्याने कीर्तीची शिखरे एकामागोमाग एक गाठणारे कुंटे अखेर तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात स्थिरावले आहेत. त्यांच्या मोठेपणाच्या अखेरच्या अवस्थेतील हा बौद्धिक पराक्रम पाहा!"

"कुंटे यांचे चाहाते ज्याला सुस्पष्ट विचार समजण्याची चूक करतात तो वस्तुतः वेडाच्या भरात त्यांच्या मनाने केलेला दंगा असतो" असे विष्णुशास्त्री यांनी फटकळपणे कुंटे यांच्या भगतगणास बजावले आहे. कुंटे यांचे महाकाव्य म्हणजे धूसर विचारांचा प्रचंड गोंधळ असून एक लेखकाचे मन वगळले तर दुसऱ्या कोणालाही ज्यामुळे सुख लाभेल असा एकही उतारा कुंटे यांच्या महाकाव्यात आढळणार नाही अशा आशयाच्या शब्दांत विष्णुशास्त्री यांनी कुंटे यांच्या वाङ्मयकृतीचा धिक्कार केला होता. या कठोर शब्दांमुळे कुंटे दुखावले जातील याची विष्णुशास्त्री यांना पूर्ण कल्पना होती म्हणून आपल्या खास शैलीत समारोप करताना विष्णुशास्त्री यांनी लिहिले :

"मिल्टन व प्लेटो यांच्याबरोबर भराऱ्या मारताना आम्ही त्यांना पाहिले. त्यांना आम्ही सामान्य कवींच्या रांगेत आणून बसवले आहे हे आमच्या निष्पक्षपाती वाचकांना

तरी निदान कळेल अशी आम्हांस आशा वाटते. अर्थातच ज्या उद्धटपणाने आम्ही त्यांची शिरोभूषणे उतरवून त्यांच्या विचारांचे व कल्पनांचे दारिद्य जगजाहीर केले ती तऱ्हा आमच्या कविराजांना आवडेल अशी आशा बाळगण्याचे साहस आम्ही करीत नाही. खरे म्हणजे वर्षानुवर्षे टिकलेला त्यांचा भ्रम किंवा त्यांना पडलेले गोड स्वप्न काही क्षणात नाहीसे करणे शक्य नाही. तरीही आपल्या सुपीक कल्पनाशक्तीवर यापुढे त्यांनी फार विसंबून राहू नये ही आमची ताकीद त्यांनी लक्षात ठेवली तरी खूप झाले!"

कुंटे यांच्याबद्दलची ही लेखमाला म्हणजे विष्णुशास्त्री यांनी त्यांच्याविरुद्ध आयुष्यभर खेळलेल्या लढाईची फक्त पहिली फेरी होती. दोघांमधील संघर्षास लवकरच निराळे परिमाण लाभले. पाच मार्च १८७३ रोजी विष्णुशास्त्री पुण्याच्या सरकारी हायस्कूलमध्ये तिसरे सहायक शिक्षक म्हणून दाखल झाले. १८७४ च्या जानेवारी महिन्यात महादेव मोरेश्वर कुंटे याच शाळेचे मुख्याध्यापक म्हणून रुजू झाल्याने विष्णुशास्त्री यांना त्यांच्या हाताखाली शिक्षक म्हणून काम करणे भाग होते. पुण्याच्या हायस्कूलमधील विष्णुशास्त्री यांच्या नेमणुकीबाबत त्यांच्या मराठी चरित्रकारांनी दिलेली माहिती वस्तुस्थितीला धरून नाही. शिक्षणसंचालक चॅटफील्ड यांच्याबरोबरच्या कृष्णशास्त्री यांच्या स्नेहसंबंधामुळे विष्णुशास्त्री यांना ही नोकरी मिळाली हे खरे आहे. एम. ए. झालेल्या आपल्या एका विद्यार्थ्याची या जागेसाठी प्राध्यापक कीलहॉर्न यांनी शिफारस केली होती तरीही चॅटफील्ड यांनी मात्र बी. ए. झालेल्या विष्णुशास्त्री यांच्यावर मेहेरबानी केली. मात्र चॅटफील्ड यांनी कुंटे यांना पत्र लिहून विष्णुशास्त्री यांची नेमणूक करण्याबद्दल सूचना केली. या कहाणीवर विश्वास ठेवणे कठीण आहे. कारण विष्णुशास्त्री यांची शिक्षक म्हणून नेमणूक झाली तेव्हा कुंटे हे शाळेचे मुख्याध्यापक नव्हते. विष्णुशास्त्री यांच्या सरकारी नोकरीबद्दलच्या अधिकृत सेवापुस्तिकेतील नोंदीवरून एच. पी. जेकब हे वीस एप्रिल १८७३ पासून मुख्याध्यापक होते आणि कुंटे हे ४ जानेवारी १८७४ पासून मुख्याध्यापकपद भूषवू लागले असे दिसते. १८७३ साली सरकारी नोकरीत शिरकाव झाला तेव्हापासून विष्णुशास्त्री यांच्या जीवनातील एक नवे पर्व सुरू झाले.



# ३ : जीवितकार्याच्या शोधात

पाच मार्च १८७३ ते १४ ऑक्टोबर १८७९ पर्यंत विष्णुशास्त्री यांनी सरकारी नोकरी केली. त्यानंतर राजीनामा देऊन खासगी शाळा स्थापन करण्याचे त्यांनी ठरवले. या सहा वर्षांहून थोड्या अधिक काळात ते फारसे सुखी नव्हते. कुंटे यांच्याबरोबर त्यांचे जमले नाही. विष्णुशास्त्री यांना चिडवण्याची व त्यांचा अपमान करण्याची मिळेल ती संधी कुंटे साधीत असत. जाहीर सभेत विष्णुशास्त्री काही क्षणदेखील बोलू शकत नसत, हे कुंटे यांना चांगले माहीत होते. त्यामुळे कुंटे म्हणत, "येथे काहीजण मोठी माणसे म्हणून मिरवतात. तरी त्यांना दोन वाक्ये इंग्रजीत बिनचूक बोलता येत नाहीत" नंतर विष्णुशास्त्री यांच्या पाठीवर थाप मारीत कुंटे म्हणत असत, "शास्त्रीबुवांना हे चांगले माहीत आहे." कुंटे कृष्णशास्त्री यांची थट्टा करीत आणि वडिलांची कोणी मस्करी केलेली विष्णुशास्त्री यांना खपत नसे. त्याबरोबरच कृष्णशास्त्री यांचे सरकारदरबारी वजन असल्याने विष्णुशास्त्री यांना त्रास देणे कुंटे यांना शक्य नव्हते.

शिक्षक म्हणून करावयाची कामे विष्णुशास्त्रीही चोख पार पाडीत नसत. शाळेत किंवा वर्गावर वेळेवर जाणे त्यांना कधीच जमले नाही. सुमार बुद्धिमत्ता किंवा बेताचा वकूब असलेल्या विद्यार्थ्यांकडे ते लक्ष देत नसत; त्यांचा अभ्यास सुधारावा म्हणून ते विशेष मेहनत करीत नसत. त्यांच्या वर्गाचे हजेरी पुस्तक नीटनेटके नसे आणि विद्यार्थ्यांच्या वह्या तपासण्याचे काम नेहमीच रेंगाळत असे. विष्णुशास्त्री यांच्या अशा वागण्यामुळे त्यांच्याविरुद्ध वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे तक्रारी करण्यास कुंटे यांना पुरेशी संधी मिळत असे. त्यामुळे दोघांमधील चकमकी तशाच चालू राहात असत.

१८७३ च्या नाताळच्या सुट्टीत जांभेकर, आगाशे व किर्लोस्कर या मित्रांबरोबर विष्णुशास्त्री आळंदी येथे सहलीला गेले होते. पुण्याला परत येताना नाना विषयांवर त्यांची चर्चा चालू होती. तेव्हा ज्यात नियमाने निबंध प्रसिद्ध करता येतील असे एखादे नवे नियतकालिक विष्णुशास्त्री यांनी काढावे असे जांभेकर यांनी त्यांना सहज सुचवले. या कल्पनेने विष्णुशास्त्री झपाटले आणि पुण्याला परतताच कोणाचाही सल्ला न घेता त्यांनी तातडतोब १८७४ च्या जानेवारीपासून 'निबंधमाला' हे नवे मासिक सुरू होणार असल्याची जाहिरात 'ज्ञानप्रकाश' पत्रात फडकावली.

'निबंधमाला' म्हणजे एकपात्री प्रयोग होता. काही वाचकांची पत्रे वगळता मासिकात प्रसिद्ध होणारा अन्य मजकूर संपादकांच्या हातचा असे. पहिल्या अंकात संपादक म्हणून विष्णुशास्त्री यांचे नाव झळकले होते पण नंतरच्या अंकात त्यांनी कधीच आपला नाम-निर्देश केला नाही. आठ वर्षांच्या काळात निबंधमालेचे एकूण ८४ अंक निघाले. मासिकाचे अंक अनेकदा वेळेवर निघत नसत. कधी संपादकाच्या आरामात काम करण्याच्या खाक्या-मुळे असे होत असे तर कधी त्याच्या खऱ्याखुऱ्या वैयक्तिक अडचणीमुळे असे घडत असे. निबंधमालेचा पहिला अंक फक्त वीस पानांचा होता तर दुसऱ्या अंकापासून छत्तीस पानांचा अंक निघू लागला. त्याची मांडणी व छपाई फारशी समाधानकारक नसली तरी ज्या प्रक्षोभक पद्धतीने मासिकाचे तरुण संपादक लिहीत त्यामुळे लवकरच वाचकांचे लक्ष या मासिकाकडे वेधले गेले. निबंधाखेरीज पुस्तक परीक्षणे, विनोद व महदाख्यायिका, अभिजात संस्कृत ग्रंथांतून वेचलेली सुभाषिते तसेच मराठी कवींच्या काव्यातील निवडक उतारेही या मासिकात दिले जात असत. व्युत्पत्तिशास्त्रात विष्णुशास्त्री यांना रस असल्याने कधी कधी काही शब्दांच्या उगमाबद्दल मनोरंजक माहितीही दिली जात असे. महत्त्वाचे शास्त्रीय शोध अगर ऐतिहासिक घडामोडी यांचेही प्रसंगपरत्वे मासिकात वर्णन केले जात असे. वाचकांचे मनोरंजन करणे तसेच उद्बोधन करणे ही आपल्या मासिकाची उद्दिष्टे असल्याचे विष्णुशास्त्री यांनी निबंधमालेच्या पहिल्याच अंकात वचन दिले होते आणि वाचकांना सुरवातीला दिलेला हा शब्द त्यांनी अखेरपर्यंत पाळला.

निबंधमालेच्या पहिल्या अंकात 'मराठी भाषेची सांप्रतची स्थिती' हा विष्णुशास्त्री यांचा निबंध प्रसिद्ध झाला होता. तेव्हाची पाश्चिमात्य विद्याविभूषित लब्धप्रतिष्ठित मंडळी मातृभाषेची हेळसांड करीत असल्याबद्दल त्यांनी त्यांच्यावर टीका केली होती. मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी पद्धतशीर प्रयत्न केले नाहीत तर इंग्रजी भाषेच्या जबरदस्त प्रभावामुळे मराठीचे स्वतंत्र अस्तित्वच आपण गमावू असा त्यांनी समकालिनांना इशारा दिला. नवे नवे शब्द बनविण्यास ते अनुकूल होते. निसर्गाचा अभ्यास करणाऱ्या नवनवीन शास्त्रासारख्या काही विषयांची नवी परिभाषा तयार करताना संस्कृत भाषेतील शब्दसंपत्तीचा उपयोग करावा असे त्यांचे म्हणणे होते. इंग्रजी-मराठी शब्दकोश तयार करणारे मेजर कँडी किंवा मोल्सवर्थ तसेच मराठी व्याकरण विकसित करणारे परके राज्यकर्ते यांनी केलेल्या प्रयत्नांची त्यांनी प्रशंसा केली. मात्र आपल्या भाषेची अभिवृद्धी करण्यासाठी आपणच प्रयत्न करण्याच्या आवश्यकतेवर त्यांनी या निबंधात भर दिलेला आढळतो.

निबंधमालेच्या दुसऱ्या अंकात प्रसिद्ध झालेल्या 'प्रस्तुत मालेचा उद्देश' या निबंधात विष्णुशास्त्री यांनी पुन्हा ज्ञानक्षेत्रातील स्वावलंबनाची महती गायिली आहे. विविध ज्ञान-शाखांतील नव्या प्रवाहांची माहिती वाचकांना करून देणे हा त्यांचा निबंधमाला सुरू करण्यामागचा एक उद्देश होता. संस्कृत व विशेषतः इंग्रजी भाषेत भरलेले अगाध ज्ञान आत्मसात करण्याची संधी किंवा सामर्थ्य ज्या असंख्य वाचकांच्या अंगी नव्हते त्यांना ते

देण्याचा विष्णुशास्त्री यांचा हेतू होता. राष्ट्र समृद्ध व्हावयाचे असेल तर त्याची भाषाही समृद्ध व्हावयास हवी हा विश्वास त्यांनी व्यक्त केला. सर्व प्रकारच्या विषयांवर मराठीत पांडित्यपूर्ण लेखन करणे शक्य आहे अशी त्यांना आपल्या वाचकांची खात्री पटवून द्यायची होती. सत्यनिरूपणाच्या उद्देशाने ग्रंथ व ग्रंथकार यांच्यासंबंधी निबंधमालेत स्पष्ट व निर्भीडपणे लिहिण्यास आपण कचरणार नाही असे त्यांनी वाचकांना बजावले आहे.

निबंधमालेच्या पुढील अंकात 'विद्वत्व आणि कवित्व' तसेच 'संपत्तीचा उपयोग' अशा त्यामानाने मिळमिळीत विषयावरचे त्यांचे निबंध प्रसिद्ध झाले. त्यानंतर सहाव्या, सातव्या व आठव्या अंकात 'इतिहास' या विषयावरचा त्यांचा विस्तृत निबंध प्रसिद्ध झाला. रेव्हरंड विल्सन यांच्यासारखे खिरस्ती धर्मोपदेशक तसेच जेम्स मिल, लॉर्ड मेकॉले, मॉरिस यांच्यासारखे इंग्रज इतिहासकार यांच्यावर त्यांनी या निबंधात कडक टीका केल्याने मोहोळ उठले. संतापलेल्या खिरस्ती धर्मोपदेशकांनी या निबंधाकडे मेजर कँडी यांचे लक्ष वेधले. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्यावर कँडीसाहेबांचा फार लोभ होता. या वादग्रस्त निबंधाचा कर्ता कृष्णशास्त्रींचा मुलगा आहे हे कळल्यावर मेजर कँडी यांना वाईट वाटले. त्यांनी कृष्णशास्त्री यांना पत्र लिहिले. आपल्या मुलाला त्यांनी ताकीद द्यावी व यापुढे असले लिखाण करण्यापासून परावृत्त करावे अशी कँडीसाहेबांनी या पत्रात कृष्णशास्त्री यांना सूचना केली होती. कँडीसाहेबांचे हे पत्र कृष्णशास्त्री यांनी विष्णुशास्त्री यांना दाखवले. तसेच त्यांनी वादविषय ठरलेला 'इतिहास' हा निबंधही वाचला. असले लेख लिहिण्यापेक्षा कायद्याचा अभ्यास करून नंतर वकिली करावी असा कृष्णशास्त्री यांनी आपल्या चिरंजीवास सल्ला दिला. १८७४ च्या अखेरीस चॅटफील्ड या शिक्षण खात्याच्या संचालकांनी पुण्याच्या सरकारी हायस्कूलला भेट दिली. त्यांनी विष्णुशास्त्री यांना चर्चेसाठी बोलावले आणि 'इतिहास' या वादग्रस्त निबंधाविषयी वाटणारे असमाधान सूचित केले. चॅटफील्ड-साहेबांबरोबरच्या या भेटीविषयीची आपली मते रोजनिशीत नोंदविताना विष्णुशास्त्री यांनी लिहिले, "या ख्यातनाम पाहुण्यांच्या सौजन्यशील वागणुकीमुळे त्यांच्याविषयी अनुकूल मत झाले."

प्रत्येक वर्षाच्या अखेरीस विष्णुशास्त्री निबंधमालेत एक खास लेख लिहून गतवर्षातील घडामोडींचा आढावा घेत असत. पहिल्या वर्षीच्या आढाव्यात मासिक काढण्याच्या आपल्या नव्या उद्योगाला आश्रय देणाऱ्या वाचकांना तसेच परमेश्वराला त्यांनी कृतज्ञतापूर्वक नमन केले आहे. अर्थप्राप्ती किंवा कोणाचे आर्जव करणे हे निबंधमाला काढण्यामागचे उद्देश नाहीत याची त्यांनी आपल्या वाचकांना पुन्हा आठवण करून दिली. 'ज्ञानोदय' हे खिरस्ती धर्मोपदेशकांचे मुखपत्र होते. इंग्रज राज्यकर्त्यांविरुद्ध लोकांना चिथावण्याचा विष्णुशास्त्री यांचा हेतू असल्याचा ज्ञानोदयकर्त्यांनी आरोप केला होता. राजद्रोहाच्या या आरोपाचे त्यांनी खंडन केले. मात्र खिरस्ती धर्मोपदेशकांनी हिंदू धर्माविरुद्ध चालवलेल्या दुष्ट प्रचार

मोहिमेस उत्तर देण्याचा व हिंदू धर्माचे संरक्षण करण्याचा आपल्याला कायदेशीर हक्क आहे हे स्पष्ट करताना त्यांनी ठणकावून सांगितले :

" इंग्रज जसे देव नव्हेत तसेच आम्हीही पशू किंवा राक्षस नाही. दोघांतही गुणदोष आहेतच आहेत; आणि त्याविषयी वाटाघाट करण्याचा अधिकार इंग्रेज ग्रंथकारांस जसा आहे तसाच तो आम्हांसही पण आहे. तो चालवणे ही आमच्या ' ज्ञानोदय ' कर्त्यांच्या मते कृतघ्नता व राजद्रोह बुद्धी होय; पण आम्हांस तसे वाटत नाही... एकंदरीत निष्पक्षपातपणाने खरा जो मजकूर आम्हांस वाटेल तो आम्ही अवश्य लिहिणार; मग तो कोणास आवडो; कोणास न आवडो ! ' खऱ्यास मरण नाही ' ही आमच्या भाषेतील उत्कृष्ट म्हण आम्हांस सर्वथैव मान्य होय ! "

त्यांना वडिलांनी केलेल्या सूचना तसेच चॅटफील्डसाहेबांनी त्यांचे मन वळविण्याचे केलेले प्रयत्न यांचा विष्णुशास्त्री यांच्यावर थोडासा परिणाम झाला असला पाहिजे, कारण एक वर्षाहून अधिक काळ त्यांनी आपले निबंध लिहिताना नजरेत भरण्याजोगा संयम दाखवलेला आढळतो. या काळात त्यांनी ' भाषादूषण ' , ' लेखनशुद्धी ', ' भाषापद्धती ', ' वाचन ', ' भाषांतर ', ' लोकमत ', ' गर्व ', ' वक्तृत्व ' या त्या मानाने निरुपद्रवी विषयांवर निबंधमालेत लिहिले. असल्या विषयांवर लिहितानाही निरनिराळ्या कारणांसाठी त्यांनी खिरस्ती धर्मोपदेशकांवर टीका करण्याचा उद्योग चालूच ठेवला. १८७५ च्या अखेरीस सालगुदस्तप्रमाणे वार्षिक आढावा घेताना, " आमचे मुख्य प्रतिपक्षी व परंपरागत चालत आलेले वैरी जे खिस्तोपासक त्यांनीही यंदा बिलकूल काही खटपट किंवा गडबड केलेली कोठे ऐकण्यात नाही " असे त्यांनी कबूल केले.

१८७५ साली शाळेत कुंटे यांच्याबरोबर तंटे चालूच होते. त्याखेरीज घरगुती घटनांमुळेही विष्णुशास्त्री यांना बराच मनस्ताप झाला. त्या वर्षाच्या आरंभी कृष्णशास्त्री यांनी तीन महिन्यांची रजा घेतली व ते काशीयात्रेस गेले. तेव्हा त्यांनी दिल्ली, आग्रा ही शहरेही पाहिली. आग्र्याहून परतताना त्यांनी छातीत फार दुखत असल्याची तक्रार केली. पुण्यास परतल्यावर कृष्णशास्त्री यांना काही दिवस संपूर्ण विश्रांती घेण्याचा वैद्यकीय सल्ला देण्यात आला. त्यांची प्रकृती तपासण्यात आली तेव्हा त्यांना मधुमेह व हृदयविकार असल्याचे आढळले. १८७५ सालच्या ऑगस्ट महिन्यात विष्णुशास्त्री यांची पत्नी प्रसूत होऊन मुलगी झाली, पण आठवड्याभरातच ही मुलगी देवाघरी गेली. त्यानंतर पंधरवडाही उलटण्याच्या आत विष्णुशास्त्री यांची आजी मृत्युमुखी पडली. काही दिवस विष्णुशास्त्री यांच्या पत्नीचीही प्रकृती काळजी वाटण्याइतपत बिघडलेली होती.

निबंधमालेच्या वर्गणीदारांच्या संख्येत वाढ होत होती एवढी एकच गोष्ट त्या काळात त्यांना दिलासा देणारी होती. मासिक काढण्याचा उद्योग आतबट्ट्याचा ठरला नव्हता. उलट वर्षअखेरीस चार-पाचशे रुपयांचा निव्वळ फायदा झाला होता. त्या दिवसांत त्यांना दरमहा मिळणारा शंभर रुपये पगारही घसघशीत उत्पन्न समजले जात असे. विष्णुशास्त्री

किंवा वयाने त्यांच्यापेक्षा लहान असलेले त्यांचे चुलते सीताराम्पंत या दोघांपैकी कोणीही आपल्या प्रपंचाला हातभार लावावा अशी कृष्णशास्त्री यांना आवश्यकता वाटत नव्हती, त्यामुळे या दोघांनाही जो पगार मिळे तो त्यांनी शिल्लक टाकावा असे कृष्णशास्त्री यांनी त्यांना सांगितले होते. या दोघांच्याही बँकेतील खात्यात किती रक्कम शिल्लक आहे याबद्दल कृष्णशास्त्री यांनी कधीही चौकशी केली नाही. चिपळूणकर कुटुंब हे संयुक्त कुटुंब होते आणि कुटुंबातील कर्ता पुरुष म्हणून कृष्णशास्त्री यांना स्वतःलाच इतका पैसा मिळत होता की आपली मुलेबाळे, धाकटा भाऊ, सुना, वहिनी यांच्याबरोबरच आपल्या पत्नीच्या माहेरची माणसे म्हणजे तिचे भाऊ, भाचे यांचेही त्यात भागत असे. विष्णुशास्त्री यांना त्यामुळे आर्थिक चणचण कधीच भासली नाही. त्यांना स्वतःलाही भरपूर पैसा मिळत होता. त्यांची राहाणी चैनीची नसून साधी होती. सढळ हाताने ते इतरांना देणग्या देत. जेव्हा जेव्हा ते मुंबईला जात तेव्हा आपल्या खासगी ग्रंथसंग्रहासाठी पुस्तके विकत घेण्यात ते खूप पैसे खर्च करीत असत.

१८७५ सालात 'लोकभ्रम' व 'वक्तृत्व' या विषयावरील त्यांच्या निबंधामुळे त्यांना बऱ्याच वाचकांची पत्रे आली. 'लोकभ्रम' या निबंधात भुतेखेते, शकुन, मंत्र, ग्रहांचे शुभाशुभ योग, नवस यासारखे लोकभ्रम व धर्मश्रद्धा यातील भेद ओळखला पाहिजे असे त्यांनी वाचकांना आवाहन केले आहे. भूतपिशाचांचे अस्तित्व सिद्ध करण्यास पुरावा नाही असे सांगून शकुनाविषयीच्या समजुतीही अशाच निराधार असल्याचे त्यांनी म्हटले आहे. विधवेचे दर्शन, प्रेत समोरून येणे या घटना अशुभसूचक मानणाऱ्या हिंदूंवर त्यांनी या निबंधात टीका केली आहे. फलज्योतिषावर विश्वास ठेवणाऱ्यांची टवाळी करून हस्तसामुद्रिक किंवा कुंडली पाहून भविष्य सांगण्याचा प्रकार दोन्हीही निरर्थक आहेत असे त्यांनी मत मांडले होते. विष्णुशास्त्री यांच्या या विचारांना हरकत घेणारी पत्रे त्यांच्या वाचकांनी तावडतोब लिहून धाडली आणि आपल्या समजुतीला पुष्टी देणारे स्वानुभव त्यांना कळवले.

'वक्तृत्व' या विषयावरच्या त्यांच्या दीर्घ निबंधामुळेही पत्रातून वाचकांनी तीव्र प्रतिक्रिया व्यक्त केली. प्रतापचंद्र मुजुमदार व स्वामी दयानंद सरस्वती या त्या काळातील नामवंत वक्त्यांबाबत आणि प्रार्थनासमाज व आर्यसमाज या संघटनांबद्दल त्यांनी उपरोधाने केलेली मल्लीनाथी त्यांच्या काही वाचकांना रुचली नाही. महादेवशास्त्री कोल्हटकर व विष्णू परशुराम रानडे या वक्त्यांची भाषणे विष्णुशास्त्री यांनी कधीही ऐकली नव्हती तरीही या वक्त्यांच्या समकालिनांकडून त्यांच्या वक्तृत्वाबद्दल विष्णुशास्त्री यांनी जे ऐकले होते त्याच्या आधारे वक्तृत्वाचा गुण त्यांच्या अंगी बराच असावा असे त्यांनी म्हटले. आपल्या काळातील वक्त्यांपैकी केशवचंद्र सेन हे अप्रतिम वक्ते असल्याचे त्यांनी सांगितले असले तरी सेन यांची व्याख्याने ऐकण्याची विष्णुशास्त्री यांना कधी संधी मिळाली नव्हती असे दिसते. विष्णुशास्त्री यांनी ज्या नामवंत वक्त्यांची भाषणे ऐकली त्यांपैकी प्रतापचंद्र मुजुमदार हे फार मोठे वक्ते आहेत असे त्यांचे मत झाले नाही. स्वामी दयानंद सरस्वती

यांच्याबद्दल तर त्यांनी तिरस्काराने लिहिले. १८७५ साली स्वामीजींनी पुण्यात दोन महिने मुक्काम केला होता. तो संपल्यानंतर त्यांना सन्मानपूर्वक निरोप देण्यासाठी पुण्यातल्या त्यांच्या चाहत्यांनी एक मिरवणूक काढली. मूर्तिपूजा व जातिव्यवस्था यांच्यावर स्वामी दयानंद यांनी व्याख्यानातून हल्ला चढवल्याने सनातनी ब्राह्मण नाराज झाले होते. त्यांनी एका गाढवाच्या गळयात पुष्पहार घालून त्या गर्दभानंदांना मिरवीत नेले. ही मिरवणूक विष्णुशास्त्री यांनी स्वतः पाहिली असल्याने तिचे वर्णन करताना पुण्यातील सनातनी ब्राह्मणांच्या या डावपेचांचा निषेध करण्याऐवजी हा खेदजनक प्रकार पाहताना आपल्याला झालेला आनंदच विष्णुशास्त्री यांनी व्यक्त केला आहे.

प्रार्थनासमाज व आर्यसमाज या संघटनांबद्दल विष्णुशास्त्री यांनी निबंधमालेत केलेल्या अविचारी टीकेचा वामन आबाजी मोडक यांनी निषेध केला. मोडक हे स्वतः सामाजिक व धार्मिक सुधारणेचे खंदे पुरस्कर्ते असून ते विष्णुशास्त्री यांचे शिक्षकही होते. ज्या व्यक्ती व संघटना यांच्याबद्दल आपणास फारशी माहिती नाही त्यांची हेटाळणी करू नये असा त्यांनी आपल्या विद्यार्थ्यास पत्र लिहून सल्ला दिला. मोडक यांचे हे पत्र 'निबंधमाला-हितेच्छु' या टोपणनावाने प्रसिद्ध झाले. विष्णुशास्त्री यांनी त्याला कडक शब्दांत प्रत्युत्तर दिले. आपण समाजसुधारक आहोत अशी बतावणी करून देशाची दिशाभूल करणाऱ्या मंडळींवर जनहितासाठी झोड उठवण्यास आपण मुळीच कचरणार नाही असे त्यांनी बजावले. राममोहन रॉय, केशवचंद्र सेन व सत्येंद्रनाथ टागोर हे खरे देशभक्त असल्यामुळे त्यांची आपण नेहमीच तारीफ केली याची त्यांनी आपल्या वाचकांना आठवण करून दिली. त्याचप्रमाणे ब्राह्मो समाज अथवा विधवाविवाहास प्रोत्साहन देणाऱ्या तसेच बाल-विवाहास विरोध करणाऱ्या संस्थांवर विष्णुशास्त्री यांनी कधीच टीकास्त्र सोडले नाही. या प्रत्युत्तरात त्यांनी कुंटे यांचे नाव न घेता त्यांच्यावर हल्ला चढवला. मात्र 'करवीरस्थ महाकवी' हा उल्लेख ते कोणाबद्दल लिहीत आहेत याची वाचकांना ओळख पटण्यास पुरेसा होता.

विष्णुशास्त्री यांनी १८७६ साली इंग्रजी भाषेबद्दलचा निबंध लागोपाठच्या चार अंकांतून प्रसिद्ध करून इंग्रजी राजवटीशी एकनिष्ठ असणाऱ्या लोकांचा रोष ओढवून घेतला. आपल्या या निबंधात त्यांनी इंग्रजी भाषा व वाङ्मय यांचा उगम व त्यांची वाढ कशी झाली हे विशद केले. बेकनपासून मेकॉले यांच्यापर्यंतच्या थोर निबंधकारांनी तसेच हॅलम, गिबन व मेकॉले यांच्यासारख्या इंग्रज इतिहासकारांनी इंग्रजी साहित्यात जी भर घातली तिचे विष्णुशास्त्री यांनी मूल्यमापन केले. खरे म्हणजे या थोर लेखकांच्या मूल्यमापनामुळे परक्या राजवटीचे पाठीराखे दुखावले गेले नव्हते. इंग्रज लेखकांनी भारताच्या इतिहासावर लिहिलेल्या ग्रंथांचे विष्णुशास्त्री यांनी कडक टीका करून वाभाडे काढल्यामुळे ही मंडळी संतापली होती. निबंधमालेच्या आठव्या अंकात ज्या विषयावर लिहून आपण मेजर कँडी व

चॅटफील्ड यांचा रोष पत्करला होता तोच विषय आपण पुन्हा हाताळला याची विष्णुशास्त्री यांना जाणीव होती.

एच्. पी. जेकब या मुख्याध्यापकांच्या हाताखाली सहायक शिक्षक म्हणून विष्णुशास्त्री यांनी काम केले होते. त्यांचे बंधू मेजर जेकब यांनी 'एलिफास' या टोपण नावाने २९ सप्टेंबर १८७८ च्या 'बाँबे गॅझेट'मध्ये एक पत्र प्रसिद्ध केले. विष्णुशास्त्री यांच्या वादग्रस्त निबंधातील काही उतारे उद्धृत करून मेजर जेकब यांनी निबंधमालाकारांवर उघड उघड हल्ला चढवला. विष्णुशास्त्री यांची ओळख बाँबे गॅझेटच्या वाचकांना करून देताना त्यांनी म्हटले, "पुण्याच्या एका कोपऱ्यात राहणाऱ्या, फार कोणास माहीत नसलेल्या निबंध-मालेच्या गुणी संपादकास प्रकाशात आणून त्याची मी आता लोकांना ओळख करून देतो. ते कोण आहेत? ते ब्राह्मण आहेत आणि दरवर्षी सरकारी शाळा-कॉलेजांतून बाहेर पडणाऱ्या अर्धशिक्षित ब्राह्मणांच्या झुंडीपैकी एक आहेत हे सांगणे खरे म्हणजे अनावश्यक आहे. ते सरकारी नोकर असून एका इंग्रजी शाळेत शिक्षक आहेत हे सांगणे तितकेच अनावश्यक आहे का? आणि मुख्याध्यापक कोण आहे? तेही ब्राह्मणच आहेत! एत-देशीयांच्या बौद्धिक व नैतिक गरजा भागवण्याचे खास गुण ज्याच्याजवळ आहेत अशा या कनिष्ठ सहकाऱ्याबद्दल या ब्राह्मण मुख्याध्यापकाने शिक्षण संचालकांकडे अहवाल पाठवला आहे काय? विशेषतः जून १८७८ च्या निबंधमालेच्या अंकातील लेखाबद्दल तसेच १८७४ च्या ऑगस्टच्या अंकातील लेखाबद्दल मुख्याध्यापकमहाशयांनी सरकारला कळविले आहे काय? पुण्यात देशी वृत्तपत्रांत येणारा मजकूर सरकारच्या निदर्शनास आणणारा कोणी अधिकारी नाही काय? आपल्या देशबांधवांच्या प्रबोधनासाठी ब्राह्मण संपादक राजद्रोहात्मक मजकूर प्रसिद्ध करीत असतात. त्याकडे सरकारचे लक्ष वेधण्यासाठी कोणत्या सद्गृहस्थाची खास निवड करण्यात आली आहे? तोही ब्राह्मणच आहे...ब्राह्मण हा जन्मतःच कारस्थानी असतो ही वस्तुस्थिती सरकारला कधी उमगणार आहे? मुंबई इलाख्यातील प्रत्येक कनिष्ठ अधिकारपदही या जातीतल्या माणसाकडेच आहे. युरोपमधील गुप्त संघटनांमधील सभासदांना जोडणाऱ्या दुव्यापेक्षाही ब्राह्मणांचे लागेबांधे अधिक जवळचे व भक्कम आहेत. देशातील असंतोषाच्या, राजद्रोहाच्या मुळाशी ब्राह्मणच आहेत हे सरकारच्या कधी लक्षात येणार आहे?"

एलिफासने केलेले बेफाट आरोप आणि त्याच्या पत्राचा दुष्ट गर्भितार्थ यामुळे त्याच्या पत्रास त्याच भाषेत उत्तर देऊन स्वतःचे संरक्षण करण्याखेरीज विष्णुशास्त्री यांना पर्याय उरला नव्हता. ९ ऑक्टोबर १८७८ च्या ज्ञानप्रकाशात त्यांचे पत्र प्रसिद्ध झाले. त्यात त्यांनी आपली भूमिका स्पष्ट केली. "आपल्या युरोपीय समकालीन वृत्तपत्रातील (बाँबे गॅझेट) पत्रलेखकाच्या प्रक्षुब्ध भावनांच्या उद्रेकास मी कारणीभूत ठरलो आहे. या पत्र-लेखकाने माझ्यावर गरळ ओकण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचा वंशाभिमान दुखावला आहे किंवा त्याच्या एव्हांगेलिकल या खिस्ती धर्मपंथावरील श्रद्धेमुळे त्याचा मनस्ताप

झालेला आहे. अशा प्रसंगी मी मौन धारण केले तर त्याचा अर्थ मी जाणीवपूर्वक अपराध केला असून त्याची मूक कबुली देत आहे असा लावला जाईल किंवा माझ्यावर हल्ला करणाऱ्याचा सामना करण्यास मी घाबरतो अशी समजूत होईल. म्हणूनच एलिफासच्या क्षुद्र व संतप्त टीकाटिप्पणीस आपल्या वृत्तपत्राच्या स्तंभातून उत्तर देण्याची मला आपण परवानगी द्याल अशी आशा आहे. ज्या वृत्तपत्रात एलिफासचे पत्र प्रसिद्ध झाले आहे त्या वृत्तपत्राच्या वृत्तीला साजेशीच एलिफासची टीकाटिप्पणी आहे हे प्रत्येकास माहीत आहेच."

आपले लेखन राजद्रोहात्मक आहे या आरोपाचा साफ इन्कार करून विष्णुशास्त्री यांनी सवाल विचारले. "पौर्वात्य भाषांबद्दल पाश्चिमात्यांचे ज्ञान सर्वसामान्यतः अपूर्ण असते असे मी म्हटले आहे. हा राजद्रोह होतो काय?...आशियाचे वैभव आणि भव्यता यांच्या तुलनेने पाश्चिमात्यांच्या हलाखीबद्दल मी जे म्हटले आहे त्याला राजद्रोह म्हणावयाचे का? बायबल आणि खिस्ती लोक यांच्याविषयीचा माझ्या उद्‍गारांचा सूर फार भक्तिभावाचा नाही. त्यामुळे राजद्रोह होतो काय?...बडोदा प्रकरणाविषयी (बडोद्याचे महाराज मल्हारराव गायकवाड यांच्या पदच्युतीविषयी) आणि प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या भेटीच्या वेळी आमच्या राजेरजवाड्यांनी जे त्यांचे स्वागत केले त्यासंबंधी मी जाता जाता लिहिले आहे. हा उल्लेख फारच निरुपद्रवी आहे आणि त्याचा राजकारणाशी दूरान्वयानेही संबंध नाही हे मी अखेरीस खात्रीपूर्वक सांगतो."

विष्णुशास्त्री यांचे सहाध्यायी व निकटचे मित्र वि. मो. महाजनी यांनी विष्णुशास्त्री यांची कड घेतली हे, 'एक ब्राह्मण' या टोपण नावाने १७ ऑक्टोबर १८७६ च्या 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्रात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या पत्रावरून उघड दिसते. महाजनी यांनी एलिफासच्या पत्राचा स्पष्ट शब्दांत धिक्कार केला. हिंदुस्थानातील सर्व लोकांमध्ये ब्राह्मण सर्वांत बुद्धिमान आहेत हे निःसंशय असे सांगून एलिफासच्या सबंध पत्रास ब्राह्मण-द्वेषाची दुर्गंधी येत आहे असे महाजनी यांनी म्हटले होते. त्यांनी विचारले होते, "जी मते प्रसिद्ध करण्यास आपल्या हाताखालचा माणूस मोकळा आहे अशा मताबद्दलही मुख्याध्यापकाने शिक्षण संचालकास अहवाल सादर करण्याचे मुख्याध्यापकाचे कर्तव्य आहे अशी एलिफासची समजूत आहे काय? देशी वृत्तपत्रांत येणारा मजकूर सरकारच्या निदर्शनास आणून देण्यासाठी नेमलेल्या अधिकाऱ्यास मासिकातील मजकुराकडे लक्ष वेधण्याचे कर्तव्य करावयाचे नसते याचा एलिफासला विसर पडला आहे काय? मग हा गदारोळ कशासाठी? ते ब्राह्मण आहेत या एकाच कारणामुळे त्यांना या वादात ओढले जात आहे असे मला वाटते." खरे म्हणजे अनेक प्रश्नांबद्दल महाजनी व विष्णुशास्त्री यांचे एकमत नव्हते. 'टाइम्स ऑफ इंडिया'ने छापलेले पत्र महाजनी यांनी लिहिले आहे हे विष्णुशास्त्री यांना काही काळ माहीतही नव्हते. महाजनी हे सामाजिक व धार्मिक सुधारणांचे खंदे पुरस्कर्ते होते. तरीही आपल्या मित्राच्या मदतीला धावणे हे महाजनी यांना आपले कर्तव्य आहे असे वाटले.

वादग्रस्त ठरलेल्या निबंधमालेच्या तिसाव्या अंकाचे इंग्रजी भाषांतर करून मेजर जेकब यांनी त्याची एक प्रत मुंबई सरकारकडे विचारार्थ पाठवली. शंकर पांडुरंग पंडित हे संस्कृतचे गाढे विद्वान विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे डेक्कन कॉलेजातले एक प्राध्यापक होते. मुंबई सरकारच्या मुख्य सचिवास भेटण्यासाठी पंडित गेले तेव्हा इंग्रजांवर शिवराळ शब्दांत हल्ला करणाऱ्या ब्राह्मण पदवीधरांबद्दल मुख्य सचिव संतापून बडबडत असलेले त्यांना दिसले. पंडित यांनी निबंधमालेचा तो वादग्रस्त अंक वाचला नव्हता त्यामुळे विष्णुशास्त्री यांच्या बाजूनें त्यांना काहीच बोलता आले नाही. मात्र वरिष्ठ अधिकाऱ्यांची मनःस्थिती ओळखून मुख्य सचिवांबरोबरच्या भेटीत काय झाले हे त्यांनी ताबडतोब विष्णुशास्त्री यांना सांगितले.

ज्या निबंधामुळे मुंबईतील इंग्रजी दैनिकांनी इतके वादळ उठवले होते तो निबंध पंडित यांच्याप्रमाणे कृष्णशास्त्री यांनीही वाचला नव्हता. त्यांच्या काही मित्रांनी विष्णुशास्त्री यांच्या लेखनातील चेष्टेच्या सुराबद्दल तक्रार केली तेव्हा चिरंजीवांविरुद्धच्या आरोपात किती तथ्य आहे हे पारखण्यासाठी त्यांनी निबंधमालेचा तो अंक वाचण्याचे ठरवले. वाचल्यानंतर चिरंजीवांच्या लेखनशैलीविषयी कृष्णशास्त्री यांनीही नापसंती व्यक्त केली आणि ते म्हणाले, "हा पोरगा एक दिवस अडचणीत येणार!" विष्णुशास्त्री यांच्या निबंधाचे जेकब यांनी केलेले भाषांतर वाचून चॅटफील्डसाहेबही रागावले पण आपली नाराजी दर्शविणारी कोणतीही कृती त्यांनी ताबडतोब केली नाही. इंग्रज लेखक व ख्रिस्ती धर्मोपदेशक यांच्यावर असेच निर्भयपणे आपण कोरडे उडवीत राहिलो तर आपण सरकारची चाकरी फार काळ करू शकणार नाही हे विष्णुशास्त्री यांनीही ओळखले असले पाहिजे. ते राजकीय प्रश्नांची सरळ सरळ चर्चा करीत नव्हते पण त्यांच्या काही निबंधांत राजकारण डोकावत होतेच. त्यांचे वाचक दोन ओळींमध्ये दडलेला राजकीय अर्थ सहज वाचू शकत होते आणि विष्णुशास्त्री यांना आपणास खरे काय सांगावयाचे आहे हेही त्यांना सहज समजत होते.

तेव्हा महाराष्ट्रात परक्या राजवटीबद्दलचा भ्रमनिरास वाढत्या प्रमाणात होत होता. अशा वेळी विष्णुशास्त्री लिहीत होते हे लक्षात ठेवावयास हवे. सार्वजनिक सभेवर तेव्हा न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांच्यासारख्या उदारमतवाद्यांचा पगडा होता. लोकांची अनेक गाऱ्हाणी सार्वजनिक सभा सरकारच्या निदर्शनास आणून देत होती. या सभेचे अर्ज-विनंत्यांचे राजकारण मात्र विष्णुशास्त्री यांना आवडत नव्हते. १८७५ साली महाराष्ट्रातल्या काही जिल्ह्यांत शेतकऱ्यांनी दंगली केल्या. संतापलेल्या शेतकऱ्यांनी अनेक सावकारांवर हल्ले केले. न्यायासाठी चाललेल्या लढ्यात त्यांनी हिंसक मार्गाचा अवलंब केला. शेतकऱ्यांची गाऱ्हाणी खरीखुरी व वाजवी होती तरी सरकारने ती दूर केली नव्हती. हजारो लोक उपासमारीमुळे तडफडून मरत होते. अन्न व रोजगाराच्या शोधात शेकडो भुकेलेले शेतकरी दुष्काळी भागातून अन्यत्र स्थलांतर करीत होते. भोवताली अभूतपूर्व

असंतोष व हलाखी असताना व्हिक्टोरिया राणी हिंदुस्थानची सम्राज्ञी असल्याची घोषणा करण्यासाठी १८७७ च्या जानेवारीत खास दरबार भरविण्याचा हिंदुस्थान सरकारने निर्णय घेतला तेव्हा अनेकांना धक्का बसला.

इंग्रज सरकारविरुद्ध संशय व द्वेष या भावनांमुळे वातावरण तंग झाले असताना विष्णुशास्त्री यांच्या तेजस्वी लेखनाची वाचकांवर जबरदस्त छाप पडली. सरकारी नोकर असल्याने त्यांना लिहिताना सावधगिरी बाळगावी लागत होती. अन्यथा सरकारी नोकरांना प्रवेश करण्यास मनाई असलेल्या धोक्याच्या क्षेत्रात त्यांची पावले पडली असती. आपल्या निबंधामध्ये ते बहुधा ग्रंथ आणि ग्रंथकार यांच्याबद्दलच लिहीत असत, पण त्यांची परीक्षणे व अभिप्राय वाचणाऱ्याला परकीय राज्यकर्ते आणि त्यांचे प्रशंसक यांच्याबद्दल निबंधमालेच्या तरुण संपादकाच्या मनात क्रोधाग्नी कसा धुमसतो आहे याची पुरेपूर कल्पना येत असे. तोल जाऊ न देता ही दोरीवरची कसरत करीत राहाणे विष्णुशास्त्री यांनाही काही वेळा कठीण होत असे. मग ते आपल्या संतापाला किंवा बेचैनीला कारणीभूत होणाऱ्या काही घडामोडींचा उल्लेख करीत असत. आपल्या चौथ्या वार्षिक आढाव्यात त्यांनी जानेवारी १८७७ मध्ये भरलेला दिल्लीदरबार, महाराष्ट्रातील दुष्काळ व हिंदुस्थानातील वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करणारा १८७८ चा कायदा यांचा निर्देश केलेला आहे.

१८७६ च्या नोव्हेंबरच्या अंकापासून डॉक्टर जॉन्सन यांच्याबद्दलचे चरित्रपर लेख ते प्रसिद्ध करू लागले. त्यांनी निबंधमालेचे आठ अंक व्यापले तर मोरोपंत या कवीविषयीच्या त्यांच्या निबंधाने मासिकाचे अकरा अंक व्यापले. त्यांनी लिहिलेले जॉन्सन यांचे चरित्र प्रसिद्ध होईपर्यंत मराठीत कोणताही लेखक चरित्राचा विषय बनलेला नव्हता. सॅम्युएल जॉन्सन यांच्यावरच्या कोणत्याही एका विशिष्ट पुस्तकावर विष्णुशास्त्री यांची लेखमाला आधारलेली नव्हती. तसेच ती मुळात इंग्रजीत लिहिलेल्या पुस्तकाच्या नुसत्या भाषांतरावरही आधारलेली नव्हती. जॉन्सन हा सर्वोत्तम इंग्रज माणसाचा प्रतिनिधी होता असे त्यांना वाटत होते. जॉन्सनचे चरित्र वाचकांना मनोरंजक तसेच उद्बोधक वाटेल अशी त्यांना आशा वाटत होती. जॉन्सनच्या काळातील इंग्लंडच्या अवस्थेसारखीच एकोणिसाव्या शतकातील हिंदुस्थानची अवस्था होती अशी त्यांची समजूत होती.

कधी कधी ते स्वतःला सॅम्युअल जॉन्सनच समजत असावेत असे वाटते. त्या दोघां-मध्ये खूपच साम्य होते हेही खरे! जरी ते सॅम्युअल जॉन्सनच्या आयुष्यातील काही पैलूंविषयी वर्णन करीत असताना दिसले तरी खरे म्हणजे ते स्वतःबद्दलच लिहीत आहेत असे कधी कधी चाणाक्ष वाचकाला वाटल्याशिवाय राहात नसे. आपल्या शिक्षकापासून जॉन्सन फारसे शिकला नाही असे विष्णुशास्त्री यांचे मत होते. बौद्धिक जिज्ञासा व खडतर परिश्रम यांच्या बळावरच जॉन्सनची महापंडित म्हणून कीर्ती पसरली. एका शाळेत सहायक शिक्षक म्हणून जेव्हा तो चाकरी करू लागला, तेव्हा जात्याच हुकूमशहा असलेल्या मुख्याध्यापकाबरोबर त्याची चकमक उडाली. यशस्वी शिक्षकास आवश्यक ते गुण

त्याच्या अंगी नव्हते आणि त्याच्या विद्यार्थ्यांनाही त्याच्याविषयी कधी आदर वाटला नाही. 'रँबलर' या आपल्या नियतकालिकातील सर्व निबंध जॉन्सनच लिहीत असे. अन्य लेखकांच्या लेखनावर तो कधीच विसंबून राहिला नाही. जॉन्सन उदार होता पण महाग कपडे किंवा त्यासारख्या चैनीच्या वस्तूंवर खर्च करणे त्याला आवडत नसे.

जॉन्सनच्या प्रसिद्ध शब्दकोशासकट त्याच्या सर्व लेखनाचे गुण दाखवल्यानंतर विष्णुशास्त्री यांनी बॉस्वेल याने लिहिलेल्या अभिजात जॉन्सन-चरित्राची तारीफ केली "बॉस्वेल जर महामूर्ख नसता तर तो इतका महान लेखक झाला नसता" असा हास्यास्पद युक्तिवाद केल्याबद्दल विष्णुशास्त्री यांनी नेहमीच्या तडफेने मेकॉलेस धारेवर धरले. बॉस्वेल हा 'मठ्ठ, परोपजीवी व बढाईखोर मूर्ख' असल्याने अमर झाला या मेकॉलेसाहेबाच्या स्पष्टीकरणाची त्यांनी टर उडवली. राजकारणात व धर्मविषयक बाबीतल्या जॉन्सनच्या परंपरानिष्ठ दृष्टिकोणाची चर्चा करण्याच्या मिषाने तसेच अठराव्या शतकातील इंग्लंडमधील परिस्थिती आणि एकोणिसाव्या शतकातील हिंदुस्थानची परिस्थिती यामधील साम्य दाखवण्याचा बहाणा करून त्यांनी आपल्या टीकेचे आवडते लक्ष्य असलेल्यांवर तुफानी हल्ला चढवला. मेकॉलेसाहेब, खिस्ती धर्मोपदेशक आणि त्यांची 'ज्ञानोदय', 'सत्यदीपिका' यांसारखी नियतकालिके, स्वामी दयानंद व जोतीराव फुले, प्रार्थनासमाज व त्याचे धुरीण, कुंटे आणि 'एलिफास' या सर्वांची त्यांनी यथेच्छ खिल्ली उडवली. बॉस्वेलच्या जॉन्सन-चरित्रातील एक पत्त पडलेला उतारा त्यांनी उद्धृत केला आहे हे अर्थपूर्ण आहे. जॉन्सनच्या ओळखीच्या एका स्त्रीने क्वेकर पंथाची दीक्षा घेतली. ती हकीकत तिच्या एका मैत्रिणीने जॉन्सनला सांगितली तेव्हा जॉन्सन भडकला आणि म्हणाला, "बाईसाहेब, ती एक दुष्ट तरुणी आहे.... ज्या धर्माचे आपल्यावर संस्कार झाले तो फार भक्कम श्रद्धेशिवाय खरे म्हणजे सोडू नये. जो धर्म तुम्हांला लाभलेला असतो तो दैवानेच तुम्हांला मिळालेला असतो. तुम्ही त्या धर्मात प्रामाणिकपणे राहिलात तर तुम्ही सुरक्षित राहाल. धर्म निवडताना तुम्ही चूक केलीत तर ती चूक खरेच धोक्याची ठरते."

विष्णुशास्त्री यांचा धर्मविषयक दृष्टिकोण, विशेषतः धार्मिक सुधारणेच्या चळवळीबद्दलचा त्यांचा दृष्टिकोण समजावून घेण्यास त्यांनी निवडलेला जॉन्सनचा हा अभिप्राय उपकारक ठरतो.

काशीनाथ नारायण साने, जनार्दन बाळाजी मोडक व शंकर तुकाराम शाळीग्राम या स्नेह्यांच्या मदतीने 'काव्येतिहास संग्रह' हे नवे नियतकालिक जानेवारी १८७८ पासून सुरू करण्याची योजना विष्णुशास्त्री यांनी १८७७ च्या मे महिन्यात आखली. साने यांनी मराठी बखरींचा संग्रह केला होता तर मध्ययुगीन मराठी कवींच्या अप्रकाशित कविता छापण्यात मोडक यांना रस होता. शाळीग्राम यांनी पोवाडे व लावण्या जमवल्या होत्या. खरे म्हणजे निबंधमालेच्या प्रकाशनाचे काम वेळच्या वेळी पुरे करणे हेच या काळात विष्णुशास्त्री यांना कठीण झाले होते. त्यामुळे निबंधमालेचे प्रकाशन चांगलेच मागे रेंगाळले होते. तरीही

काव्य व इतिहास यांच्याबद्दलच्या विष्णुशास्त्री यांना वाटणाऱ्या प्रेमामुळे या नव्या उपक्रमात सहभागी होण्यास ते तयार झाले.

'चित्रशाळा' या नव्या उद्योगास लागणारे भांडवल देण्याचाही त्यांनी निर्णय घेतला. विख्यात पौराणिक व ऐतिहासिक व्यक्तींची रंगीत चित्रे छापण्याची त्यांची कल्पना होती. बाळकृष्ण वासुदेव जोशी या शाळीग्राम यांच्या मित्रास फोटोलिथोग्राफीची कला अवगत होती. त्यांच्या सहकार्याने चित्रशाळा स्थापन करण्याची विष्णुशास्त्री यांची इच्छा होती. हे नवीन उद्योग किफायतशीर ठरल्यास नोकरीचा राजीनामा देऊन लेखनावर स्वतंत्रपणे निर्वाह करणे जमेल असा कदाचित त्यांचा होरा असावा.

'काव्येतिहाससंग्रह' व 'चित्रशाळा' या नव्या उद्योगांची पूर्वतयारी करण्यात ते गुंतले असताना रत्नागिरीस त्यांची बदली करण्याच्या सरकारच्या निर्णयाबाबतचा हुकूम १८७७ च्या डिसेंबरमध्ये त्यांच्या हाती देण्यात आला. इंग्रजी भाषेवरील त्यांच्या निबंधात त्यांनी खिस्ती धर्मोपदेशक व इंग्रज इतिहासकार यांच्यावर जी घणाघाती टीका केली होती तिच्याबद्दल शिक्षण संचालकांनी त्यांना ही शिक्षा केली होती हे उघड होते.

रत्नागिरीस त्यांची बदली झाल्यामुळे काही समस्याही निर्माण झाल्या. पत्नी गरोदर असल्याने त्यांना रत्नागिरीस एकटेच जावे लागले. रत्नागिरीस राहून निबंधमाला प्रसिद्ध करणे जमेल की नाही याचीही त्यांना खात्री वाटत नव्हती. मात्र कुंटे जेथे मुख्याध्यापक आहेत अशा शाळेत काम करावे लागणार नाही या कल्पनेनेही त्यांना मोकळे झाल्यासारखे वाटले. जनार्दन बाळाजी मोडक हे विष्णुशास्त्री यांचे स्नेही तेव्हा रत्नागिरीच्या माध्यमिक शाळेत शिक्षक होते आणि रत्नागिरीस वामन आबाजी मोडक या मुख्याध्यापकांच्या हाताखाली त्यांना काम करावयाचे होते. वक्तृत्व या विषयावरच्या त्यांच्या निबंधातील कुचेष्टेच्या सुरास मोडक यांनी आक्षेप घेतला असताना मोडक यांच्या पत्रास विष्णुशास्त्री यांनी कडक शब्दांत उत्तर दिले होते तरी मोडक यांच्या मनात आपल्या या माजी विद्यार्थ्याबद्दल आकस नव्हता. रत्नागिरीचे वातावरण अनुकूल असल्याचे दिसताच विष्णुशास्त्री यांनी २ जानेवारी १८७८ रोजी वडिलांना लिहिले,

"मी आता रत्नागिरीत सुखरूप आहे... येथे एक सार्वजनिक वाचनालय आहे. त्यात बरीच पुस्तके आहेत. अनेक वृत्तपत्रे, नियतकालिकेही येथे चाळता येतात. माझे अनेक चांगले स्नेही येथे आहेत. आपण येथे अनोळखी आहोत असे ते मला वाटू देत नाहीत. माझे सध्याचे मुख्याध्यापक सर्वांशी मिळून मिसळून वागणारे सद्गृहस्थ आहेत असे त्यांच्या प्रत्येक कनिष्ठाप्रमाणेच मलाही वाटते. त्यांच्या बरोबर असताना दर क्षणी मागे वळून पाहिल्याशिवाय राहावत नाही. दुष्ट जुलमी राजवटीतून आपली मुक्तता झाली असे वाटल्याशिवाय राहात नाही."

आपले चुलते सीतारामपंत आणि स्नेही शाळीग्राम यांची मदत घेऊन विष्णुशास्त्री निबंधमालेच्या प्रकाशनाची तजवीज करीत होते. ते पैशाच्या व्यवहारांची काळजीपूर्वक

नोंद घेत असत. मासिकाच्या खपाबद्दल ते वारंवार चौकशी करीत असत. जी बिले थकलेली असत त्यांचा तपशील ते वारंवार विचारून घेत असत. निबंधमालेच्या व्यवस्थापकास २ मार्च १८७८ रोजी लिहिलेल्या पत्रात त्यांनी विचारले, "मासिकाचे किती अंक शिल्लक आहेत ? जर वर्गणीदारांची संख्या साडेसहाशेपर्यंत गेली असेल तर आणखी प्रती काढण्याविषयी मला सांगावे लागेल." १ एप्रिल १८७८ रोजी त्यांनी शाळीग्राम यांना लिहिले, "नवंबरच्या अंकाला का उशीर लागतो आहे ? आपल्या वर्गणीदारांच्या सहनशीलतेचे मला आश्चर्य वाटते. मासिकाच्या किती प्रती शिल्लक आहेत याबद्दल तुम्ही (किंवा पूर्वीच्या व्यवस्थापकांनी) मला काहीच कळवलेले नाही. कोल्हापूरच्या प्रतिनिधीकडे बिल पाठवले आहे की नाही हे देखील मला माहीत नाही. डिसेंबरच्या अंकाची एक प्रत तुम्ही तावडतोब पाठवून द्या. मला त्या प्रतीची फार आवश्यकता आहे." निबंधमालेचा नवंबर १८७७ चा अंक प्रसिद्ध करण्यात अडचण आली होती हे उघड दिसते. म्हणूनच पाच महिने उलटून गेले तरी वाचकांना हा अंक मिळाला नव्हता.

चौथ्या वर्षाच्या आढाव्यात त्यांनी या विलंबाची कारणे आपल्या वाचकांना समजावून सांगितली आहेत. रत्नागिरीला झालेली बदली हे एक कारण होतेच. वृत्तपत्रांच्या मुस्कटदाबीचा नवा कायदा हाही एक मोठा अडथळा ठरला. लॉर्ड लिटनच्या नेतृत्वाखालच्या हिंदुस्थान सरकारने १८७८ साली, कायदा करून वृत्तपत्रस्वातंत्र्यावर व अभिव्यक्तिस्वातंत्र्यावर अनेक निर्बंध लादले. आपण त्यामुळे 'नाउमेद' झालो आणि प्रतिपक्षीयांचा समाचार आता आपल्याला 'बेताबातानेच घ्यावा लागेल' असे वाटल्याचे त्यांनी कबूल केले आहे. "काही वेळ आमचा असा कल झाला की हे काम आजच बंद करावे हे बरे. पावलोपावली अंग चुकविण्याची कसरत करीत मार्गक्रमण करण्यापेक्षा मुळीच मुक्काम न करणे काय वाईट ?" असे वाटल्याचेही त्यांनी सांगितले आहे. कायद्याच्या कचाट्यात आपण सापडू नये म्हणून सरकारविषयी तसेच खिस्ती धर्मोपदेशकांविषयी लिहिताना सावधगिरी बाळगावी लागेल ही कबुलीही त्यांनी दिलेली आढळते. जेव्हा वृत्तपत्रासंबंधीचा कायदा मंजूर झाला तेव्हा निबंधमालेचा छापखान्यात "जुळलेला अंक बहुतेक सारा रद्द" करावा लागला. नाहीतर कदाचित त्या मूळच्या मजकुराबद्दल नव्या कायद्यान्वये त्यांच्यावर खटला भरला गेला असता ! अखेर वृत्तपत्रासंबंधीच्या नव्या कायद्याच्या कक्षेबाहेर असलेल्या विषयांवर लिहिण्याचा त्यांनी निर्णय घेतला. वर्गणीदारांनी पुढील वर्षाची रक्कम पाठवण्यास दिरंगाई केली तर आपण जसे त्यांना माफ करतो तसेच वर्गणीदारांनीही अंक उशिरा काढल्याबद्दल आपल्याला माफ करावे अशीही त्यांनी निबंधमालेच्या वर्गणीदारांना विनंती केली.

१८७८ च्या मे महिन्यात शाळेला उन्हाळ्याची सुट्टी असल्याने विष्णुशास्त्री पुण्यास आले. कृष्णशास्त्री यांची तब्येत चांगली नव्हती. त्यांनी वसंत व्याख्यानमालेतील [पुण्याच्या सांस्कृतिक जीवनात आजही ही व्याख्यानमाला म्हणजे महत्त्वाची घटना मानली जाते.]

काही भाषणे ऐकली. मात्र आजारपणामुळे या व्याख्यानमालेतील शेवटच्या भाषणाच्या वेळी ते अध्यक्षस्थान भूषवू शकले नाहीत. १० मे १८७८ रोजी त्यांना हृदयविकाराचा तीव्र झटका आला. त्यांचे निकटचे मित्र प्रख्यात शल्यविशारद डॉक्टर विश्राम रामजी घोले यांनी त्यांना औषधोपचार केले. त्यांच्या प्रकृतीत थोडी सुधारणा झाली पण पुन्हा १७ मे रोजी त्यांना असह्य वेदना होऊ लागल्या. तरीही देवाचे नाव घेण्यास व त्याची प्रार्थना करण्यास त्यांनी नकार दिला. कृष्णशास्त्री नास्तिक म्हणून ओळखले जात असत. मरणोन्मुख असतानाही त्यांनी घोले यांना सांगितले, "विश्राम, तू माझा परमेश्वर आहेस. विष्णू आणि राम यांना मी ओळखत नाही." मृत्यू आपल्याभोवती घोटाळत आहे आणि कोणत्याही क्षणी तो आपल्यावर झडप घालील आणि उचलून घेऊन जाईल हे त्यांच्या लक्षात आले. २० मे १८७८ रोजी त्यांनी आपला धाकटा भाऊ सीताराम यास बोलावून घेतले. विष्णुशास्त्री व लक्ष्मणराव या आपल्या मुलांबरोबर भांडू नकोस असे त्यांनी भावाला सांगितले. भावाभावांचे हे बोलणे झाल्यानंतर काही मिनिटांनी कृष्णशास्त्री यांचे निधन झाले. त्यांच्या मृत्यूबद्दल महाराष्ट्रातील प्रतिष्ठित मंडळींनी दुःख व्यक्त केले. आपल्या स्नेह्याच्या मृत्यूबद्दल शोक व्यक्त करण्यासाठी महादेव गोविंद रानडे यांनी एक सभा भरवली. कृष्णशास्त्री यांना श्रद्धांजली वाहणाऱ्या विद्वानांमध्ये रामकृष्ण गोपाळ भांडारकर व काशीनाथ त्र्यंबक तेलंग हे अग्रगण्य पंडितही होते.

कृष्णशास्त्री यांच्या मृत्यूनंतर पंधरवडाही उलटण्या आधीच सीतारामपंत यांनी वडिलार्जित मालमत्तेतील आपला हिस्सा मागितला. कृष्णशास्त्री यांच्या अखेरच्या वर्षात चिपळूणकर कुटुंबात दोन तट पडले होते. एक गट सीतारामपंतांचा तर दुसरा गट होता विष्णुशास्त्री यांच्या मातोश्रींचा! त्यांना विष्णुशास्त्री यांच्या मामांचा पाठिंबा होता. घरातील भांडणे मिटवण्याचे काम वडिलांवर सोपवून विष्णुशास्त्री या सतत चाललेल्या कुरबुरीपासून दूर राहिले होते. आपले चुलते सीतारामपंत यांच्यापेक्षा वयाने दोन वर्षांनी विष्णुशास्त्री मोठे होते. त्यामुळे कृष्णशास्त्री यांच्या निधनानंतर ते कुटुंबातील कर्ते पुरुष झाले. कुटुंबप्रमुख म्हणून त्यांना दोन्ही गटांच्या भांडणात मध्यस्थी करावी लागली. ही कटकट अधिक वाढू नये म्हणून मालमत्तेची वाटणी करण्यास ते तयार झाले. मालमत्तेची किंमत ठरवून तिघाही वारसदारांना म्हणजे सीतारामपंत, विष्णुशास्त्री व लक्ष्मणराव यांना सारखा वाटा मिळावा असे त्यांनी सुचविले. या रास्त सूचनेच्या आधारे सर्वमान्य तोडगा काढून तंटा मिटविण्याची त्यांनी केरूनाना छत्रे यांना विनंती केली. तरीही समाईक मालकीची मालमत्ता कोणती याबद्दल सीतारामपंत यांनी भांडण उकरून काढलेच! आधीच्या पाच वर्षांत विष्णुशास्त्री यांनी स्वतंत्रपणे कमावलेल्या पैशाचाही वाटणी करावयाच्या संपत्तीत समावेश करावा असे सीतारामपंतांचे म्हणणे होते. त्यामुळे वाटाघाटीत कोंडी निर्माण झाली. विष्णुशास्त्री यांच्या सेवा–पुस्तिकेवरून त्यांनी १ जून ते १५ जुलै १८७८ पर्यंत सहा आठवड्यांची रजा घेतली होती असे दिसते. वाटणीबाबतचा कोणताच सर्वमान्य तोडगा दृष्टीपथात

न आल्याने विष्णुशास्त्री रत्नागिरीस निघून गेले. त्यांचे बंधू लक्ष्मणराव आधीच उमरावतीस निघून गेले होते. १८७८ च्या एप्रिलपासून ते तेथील माध्यमिक शाळेत शिक्षक म्हणून काम करीत होते.

रत्नागिरीस परततात्च विष्णुशास्त्री यांनी धाकट्या भावास लिहिले, " घरात तू गेल्यानंतर काय झाले हे तुला आतापर्यंत समजले असेलच. सीतारामपंत अजून आपल्याकडेच राहातात. विघ्नसंतोषी लोकांना वगळून फक्त काशीताईच्या मातोश्रींना घरात येण्याची मुभा आहे. आपल्या गैरहजेरीत घरात शांतता राखण्याचे काम पाटकर आणि छत्रे करीत आहेत. पुढे काय होते ते पाहू या. आता गृहकलहाला रोज एक नवीन वळण मिळत आहे. त्यामुळे तुला मी खालीलप्रमाणे सल्ला देईन. आपण प्रत्येक बाबतीत एकमेकांपासून अलग राहू या. एका बाजूला मनमानी वर्तणूक करणारे काका आणि दुसऱ्या बाजूला कोणाच्याच कह्यात न राहाणारे मामा यांच्याशी कसे वागावे याबद्दल तू खबरदारी घे. दोघांशीही एकाच वेळी सहानुभूतीने वागून चालण्यासारखे नाही हे मला वाटते, अलीकडच्या अनुभवावरून तुझ्या लक्षात आले असेलच. जर आपले नुकसान होऊ नये व आपल्याला त्रास होऊ नये असे तुला वाटत असेल तर या दोघांच्याही बाबतीत तुझे वागणे थंडपणाचे असू दे.

प्रयत्नपूर्वक तू मौन धारण करावेस असे मी तुला गंभीरपणे सुचवीत आहे. दोन्ही पक्षांपैकी कोणाशीही वारंवार पत्रव्यवहार करून तू मनस्ताप करून घेऊ नकोस. महिन्यातून घरी एकदा खुशालीचे त्रोटक, रुक्ष व औपचारिक पत्र पाठविलेस तरी पुरेसे होईल. तुझे काका किंवा मामा यांच्यापैकी कोणाचीही नानाविध युक्त्या योजून मला त्रास देण्याची हिंमत नाही. त्यांना वठणीवर आणण्याचे काम माझ्यावर सोपव. माझ्या पुण्यातील मुक्कामात विशेषतः शेवटच्या दिवशी, त्यांच्या भांडणाचा मला इतका वीट आला की मी व ही नतद्रष्ट माणसे यांच्यामध्ये अरबी समुद्र अडवा आला असता तर मला फार आनंद झाला असता..."

रत्नागिरीला परतल्यावर त्या लहानशा शहरातील आयुष्याचा त्यांना फार कंटाळा आला. त्यांचे मित्र जनार्दन बाळाजी मोडक आणि मुख्याध्यापक वामन आबाजी मोडक या दोघांचीही बदली झाली होती. नारायण विनायक साठे या नव्या मुख्याध्यापकाबद्दल विष्णुशास्त्री यांचे मत बरे नव्हते. पुण्यातील चित्रशाळाही फार चांगली चालली नव्हती. बाळकृष्ण वासुदेव जोशी या आपल्या भागीदाराला रत्नागिरीहून त्यांना पैसे पाठवावे लागत होते. सीतारामपंतांना हे सांगू नका असे त्यांनी बाळकृष्णपंत जोशी यांना एका पत्रात लिहिले. जोशी व शाळीग्राम यांनी आपल्याकडून उसने घेतलेल्या पैशाबद्दल त्यांनी काळजी करू नये असेही त्यांनी लिहिले. दोघांनाही त्यांनी आश्वासन दिले, " माझा हेतू केवळ व्यापार करण्याचा असता तर चित्रशाळा मी काढली नसती किंवा निबंधमालाही मी सुरू केली नसती." चिपळूणकर कुटुंबाभोवती मृत्यू घिरट्या घालीत होताच. १८७८ च्या

सप्टेंबर महिन्यात विष्णुशास्त्री यांचे मेहुणे [ त्यांची बहीण दुर्गा हिचे यजमान ] तरुण वयात कालवश झाले. या आकस्मिक मृत्यूमुळे विष्णुशास्त्री यांना जबर धक्का बसला. आपले बंधू लक्ष्मणराव यांना लिहिलेल्या छोट्याशा हृदयस्पर्शी पत्रात विष्णुशास्त्री यांनी म्हटले,

"अलीकडच्या दुर्घटनेबद्दल तुला कळले असेलच. दुर्दैवाचा हा सर्वांत जबरदस्त तडाखा आपल्याला बसला हे निःसंशय! आपल्या जीवनप्रवासात आता खरेच वादळ घोंगावू लागले आहे असे म्हटले पाहिजे. त्यामुळे खचून न जाता ते आपण सोसून शक्य तितक्या लवकर सावरू या. कणखर नाविकाप्रमाणे प्रतिकूल हवामानाच्या प्रत्येक प्रकाराशी सामाना करण्यास आपण सिद्ध होऊ या."

गृहकलहातून काही निष्पन्न होणार नाही; फक्त प्रत्येकाचे आयुष्य दुःसह होईल हे सीतारामपंतांना समजावून सांगण्याचा विष्णुशास्त्री यांनी शेवटचा प्रयत्न करून पाहिला. १२ सप्टेंबर १८७८ रोजी रत्नागिरीहून त्यांनी सीतारामपंतांना पत्र धाडले. त्यात त्यांनी लिहिले,

"आतापर्यंत तुम्ही मला पाठविलेल्या पत्रांपैकी कालचे पत्र फारच मनस्ताप देणारे होते. त्या पत्रात उघड झालेल्या अनेक तापदायक गोष्टींपैकी तुमचे प्रकरण हे एक होते. घरातील बाकीची सर्व माणसे घर सोडून गेलेली असताना एकट्याने घरात राहाणे कधीही सुखावह होत नाही. मात्र जेथे सतत भांडणे चाललेली असतात अशा घरात राहाणे हे त्यापेक्षाही दुःखदायक असते. त्यातही सद्यःस्थितीत दुर्दैवाचे आघात होत असताना अशा घरात राहाणे अनंतपटीने दुःसह होते. अशा वेळी जबाबदारीच्या ओझ्याखाली आपण चिरडले जातो. सध्याच्या तुमच्या केविलवाण्या स्थितीबद्दल मला खरेच फार वाईट वाटते. तुमच्या स्थितीच्या सर्व दुःखद बाजू मला दिसतात. गृहकलहामुळे किती विचित्र व अडचणीच्या परिस्थितीत माणूस अडकतो हे तुम्हांला दिसत नाही का? ज्यांना कायमचे तोडणे शक्य नसते अशा माणसांपैकी कोणाही बरोबर भांडण करून उपयोग नसतो. माझ्या आधीच दुःखी असलेल्या आईचे आणि तिच्या सर्वस्व हरपलेल्या मुलीचे तुम्ही कसे सांत्वन कराल? आजवर जे जे झाले त्याबद्दल अर्थातच तुम्हांला सर्वस्वी दोष लावता येणार नाही. तुमचे गाऱ्हाणे कितीही न्याय्य असले तरी घरातील मतभेद फार ताणणे शहाणपणाचे नसते हे आताच्या उदाहरणावरून तुम्हांला स्पष्ट दिसले असेलच... घरातील मंडळींची आरोपप्रत्यारोप करण्याची वृत्ती अपकीर्तिकारक व अविचारीपणाची असते. हजारो कुंटे व चॅटफील्ड यांनी दिलेले आव्हान स्वीकारून त्यांची तमा न बाळगता मी त्यांच्याशी झुंज घेऊ शकतो. मात्र घरातील मंडळींनी केलेल्या अपशब्दांच्या वर्षावाला एखाद्या कठोर शब्दानेही उत्तर देणे मला कठीण जाते. ज्यांच्या नावलौकिकाचा आपल्याला वारसा मिळाला आहे त्या माझ्या वडिलांच्या नावाने, जी मला आईपेक्षाही जास्त जवळची वाटे त्या माझ्या दिवंगत आजीच्या नावाने, माझ्या भावाच्या आणि आपल्या सर्व प्रेमळ व एकनिष्ठ मित्रांच्या वतीने मी तुम्हांला कळकळीची विनंती करतो की, यापुढे तरी

शहाण्यासारखे वागा. घरातील तंटेबखेडे कमी होण्याऐवजी वाढण्याचाच धोका मला दिसतो. आपल्या विश्वासू मित्रांबरोबर भरपूर विचारविनिमय केल्याशिवाय कोणतेही पाऊल टाकू नका. अलीकडचे दुर्दैवाचे तीव्र आघात आठवले आणि माझ्या गरीब आईचे स्मरण झाले की मला कापरे भरते."

हे पत्र लिहिल्यानंतर अवघ्या एका महिन्यात दुर्दैवाचा आणखी एक तडाखा बसेल याची त्यांना मुळीच कल्पना नव्हती. विष्णुशास्त्री यांचा मुलगा पुरता एक वर्षाचाही झाला नव्हता. तो १८७८ च्या ऑक्टोबर महिन्यात मृत्युमुखी पडला. मुलगा जन्मल्यापासूनच अशक्त होता आणि आजीने त्याच्या प्रकृतीची खूप काळजी घेतली तरी जगला नाही. या दुःखद घटनांमुळे उदास होऊन विष्णुशास्त्री दिवाळीच्या सुट्टीत पुण्याला परतले आणि गृहकलहात सापडले. घरात चाललेल्या सततच्या भांडणामुळे निराश मनःस्थितीत ते सुट्टी संपताच रत्नागिरीला परतले.

१८७९ च्या आरंभी या निराश मनःस्थितीवर त्यांनी मात केलेली दिसते. प्रतिकूल परिस्थितीला तोंड देण्याचा त्यांनी निर्धार केला. निबंधमालेच्या प्रकाशनास लागणारा विलंब टाळण्यासाठी त्यांनी निबंधमालेचा अंक मुंबईत छापण्याची व्यवस्था केली. यापुढे निबंधमालेची अधिक चांगली व्यवस्था होईल अशी त्यांनी २ फेब्रुवारी १८७९ रोजी दामले यांना लिहिलेल्या पत्रात आशा व्यक्त केली. त्यांनी आपल्या मित्राला दिलासा दिला, "लोकहिताच्या दृष्टीने सर्वांत महत्त्वाच्या विषयाचे विवेचन करणाऱ्या निबंधमालेच्या ताज्या अंकाच्या प्रकाशनास उशीर लागणार नाही. ताजा अंक लोकांना फार आवडेल असे वाटते." लोकहितवादी या निबंधाबाबतचा हा निर्देश त्यांनी केलेला असावा. हा निबंध अखेर १८८० साली निबंधमालेच्या बारा अंकात [ क्र. ६४ ते ७६, क्रमांक ७२ चा अंक वगळून ] प्रसिद्ध झाला.

विष्णुशास्त्री यांच्याकडे काही वाचकांनी तक्रार केली. निबंधाचा आकार फार कमी झाला असून पूर्वीपेक्षा सुभाषिते व इतर विषय अंकाची जागा जास्त व्यापीत आहेत असे या वाचकांचे म्हणणे होते. विष्णुशास्त्री यांनी हा आक्षेप मान्य केला. मात्र ओज किंवा स्वतंत्र वृत्ती या दृष्टीने मासिकाचे रूप बदलले आहे, सूर सौम्य झाला आहे या आरोपाचा त्यांनी जोरदार इन्कार केला. एका वाचकाला लिहिलेल्या पत्रात स्वतःचे समर्थन करताना त्यांनी लिहिले,

"अगदी अलीकडच्या म्हणजे बावन्नाव्या अंकाचे उदाहरण आपण घेऊ या. यात थोर रावबहादुरावर ( म. गो. रानडे ) चढवलेला हल्ला पूर्वीच्या हल्ल्यांच्या तुलनेने सणसणीत नाही असे म्हणता येईल का ! खरे म्हणजे सगळे दयानंद व जोतीबा एकत्र केले तरी ज्यांचे पारडे जड होईल अशा रावबहादुरासारख्या धेंडाला चीत करणे हे कितीतरी पटीने श्रेयस्कर आहे. 'गुलामगिरी' या पुस्तकाच्या लेखकाच्या तुलनेने रावबहादुराविषयी लिहिताना माझा सूर आदराचा आहे हे खरे ! कारण जोतीबा म्हणजे माणसाचे कातडे

पांघरलेला खर्डेघाशा! रावबहादूर हे या युगातील अग्रणी! या दोघांमधला फरक शब्दाने व्यक्त करण्यापलीकडचा! विवेचनातील जोरकसपणा व स्पष्टपणा लक्षात घेतला तर पूर्वीच्या अंकांच्या मानाने या अंकात दर्जा ढासळला आहे असे मला आढळले नाही. माझ्या लेखणीतील ताकद व चैतन्य कमी झाले आहे असे मला वाटत नाही. माझ्या मनात फार दिवस घोळत असलेल्या विषयावर १८७८ च्या निंद्य कायद्यामुळे लिहिता येत नाही हे निःसंशय! पण ते विषय म्हणजे सरकार, ख्रिस्ती धर्मोपदेशक, जोतीबा व दयानंद यांसारखे विषय मी आधीच हाताळले आहेत. ज्याला दृष्टी आहे आणि ज्याच्या हाती लेखणी आहे त्याला जगात कधीच संपुष्टात न येणारे असंख्य विषय सापडतात!"

१८७९ च्या सुरवातीपासून नोकरीचा राजीनामा देऊन पुण्यात खासगी शाळा सुरू करण्याचा विचार ते गंभीरपणे करू लागले. बाबा गोखले यांच्या शाळेत काही काळ त्यांनी शिकविले होते. त्यांच्यासमोर त्या शाळेचे उदाहरण होते. आपल्या सवयीनुसार त्यांनी कोणाशीही सल्लामसलत केली नाही. दरमहा शंभर रुपये पगाराची शिक्षकाची कायम व निवृत्तीवेतनाची तरतूद असलेली नोकरी सोडण्याच्या निर्णयाबाबत विष्णुशास्त्री यांनी कोणाही नातेवाईकास कळवले नाही. सर्व निर्णय ते स्वतःच घेत असत.

१८७९ च्या एप्रिलमध्ये ते पुण्यास परतले. खासगी कामासाठी १३ एप्रिल ते १४ ऑक्टोबर १८७९ पर्यंत विष्णुशास्त्री यांनी सहा महिन्यांची रजा मागितली होती असे त्यांच्या सेवा–पुस्तिकेवरून दिसते. रजेची मुदत संपल्यानंतर नोकरीवर रुजू होण्याचा त्यांचा इरादा नव्हता हे माहीत नसल्यामुळे सरकारने त्यांच्या विनंतीनुसार रजा मंजूर केली होती. स्वतःच्या मालकीची शाळा काढण्याचा त्यांचा विचार होता. त्यामुळे पुस्तकांचे दुकान काढले तर किफायतशीर होईल असे वाटल्याने त्यांनी शाळीग्राम यांच्या भागीदारीत १८७९ च्या जुलै महिन्यात 'किताबखाना' सुरू केला. चित्रशाळेने काढलेल्या तसबिरींचाही खप चांगला होत होता. हा उद्योगही किफायतशीर होईल अशी त्यांना आशा वाटू लागली. रत्नागिरीला परत जायचे नाही असा त्यांनी निश्चय केला होताच. त्यामुळे त्यांनी निबंध-मालेचे कार्यालय मुंबईहून पुण्यास आणले. भावाला लिहिलेल्या पत्रामध्ये विष्णुशास्त्री यांना वाटणारा आत्मविश्वास आणि भविष्यकाळाबद्दल वाटणारा आशावाद लख्ख उमटला आहे. १० ऑगस्ट १८७९ रोजी लक्ष्मणराव यांना लिहिलेल्या पत्रात त्यांनी निर्वाळा दिला, "पुढे घडणार आहे ते सारे आनंददायीच असेल. पाऊस फारच चांगला झाला आहे. घरातही पूर्ण शांतता आहे. माझी प्रकृती उत्तम आहे. तीन अंक मी लिहिले आहेत... म्हणूनच ऑक्टोबरमध्ये साऱ्या ऐश्वर्यानिशी पडदा उघडेल...'

१८७९ च्या सप्टेंबरमध्ये विष्णुशास्त्री यांनी रत्नागिरी हायस्कूलचे मुख्याध्यापक नारायण विनायक साठे यांच्याकडे राजीनाम्याचे पत्र धाडले. साठे यांनी ते शिक्षण संचा-लकांकडे पाठवावे अशी त्यांनी विनंती केली. साठे यांनी ते पत्र तावडतोब पुढे पाठवले नाही. विष्णुशास्त्री यांनी आपल्या निर्णयाचा फेरविचार करावा असे साठे यांनी त्यांना

लिहिले. पगार वाढण्याची व बढती मिळण्याची शक्यता असलेली सरकारी नोकरी सोडून देणे हा शुद्ध वेडेपणा आहे असे विष्णुशास्त्री यांच्या बहुतेक सहकाऱ्यांचे मत होते. रत्नागिरीच्या शाळेतील विष्णुशास्त्री यांचे एक मित्र रामभाऊ गांगण यांनी विष्णुशास्त्री यांनी राजीनामा परत घ्यावा यासाठी त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. त्यांना लिहिलेल्या उत्तरात नोकरी सोडण्याच्या निर्णयाची कारणे त्यांनी गांगण यांना समजावून सांगितली आहेत,

"मी शिक्षकाची जागा सोडून दिल्यामुळे येथे आणि तेथे रत्नागिरीतही बरेच काही बोलले जात आहे याचे नवल वाटत नाही. हे दिवस हतबल होण्याचे, गुलामगिरीत आनंद मानण्याचे आहेत. त्यामुळे सरकारी नोकरी मिळणे म्हणजे नंदवनात राहायला मिळणे असे समजले जाते. अशा स्थितीत मिळालेली सरकारी नोकरी जाणूनबुजून सोडून देणे हा वेडेपणा वाटणे किंवा आत्महत्या करणे आहे असे वाटणे साहजिक आहे. मी मात्र या बाबतीत नेहमीच वेगळ्या रीतीने विचार केला आहे. हुकूमशहासमोर गुडघे वाकवण्यापेक्षा बेडी एकदाच आणि कायमची तोडणे मला पसंत आहे. येथे असताना कुंटे यांच्या-बरोबर माझे कसे संबंध होते हे मी तुम्हांला एकदाच काय अनेकदा सांगितले आहे. रत्नागिरीला माझी बदली केल्याचा हुकूम माझ्या हाती पडला तेव्हाच मी नोकरी सोडण्याचा निश्चय केला, पण अनेक कारणांमुळे माझे गाव व घर सोडणे तेव्हा मला भाग पडले. तेव्हाही योग्य संधी मिळताक्षणीच स्वतंत्र होण्याची आशा मी बाळगली होती. सरकारी शाळेतल्या कंटाळवाण्या मास्तरकीचा मला अत्यंत वीट आल्यामुळेच मी राजीनामा दिला आहे. मासिक हिरिरीने चालवून लोकहितासाठी काय करता येईल ते पाहण्याचा माझा प्रयत्न आहे. 'अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' या पुस्तकाची नवी आवृत्ती, शालापत्रकातील मराठी व्याकरणाबद्दलचे निबंध, संस्कृत कविपंचक वगळून अन्य संस्कृत कवींबद्दलचे निबंध आणि फार दिवसांपासून लिहावयाचे म्हणून ठरवलेले अनेक इतर ग्रंथ काही दिवसांनी प्रसिद्ध झालेले तुम्हांला पाहावयास मिळेल."

त्यांच्या राजीनाम्याची बातमी ऐकून अनेकजण साशंक झाले, मात्र विद्यापीठाच्या पदवीपरीक्षेची तयारी करीत असलेल्या काही तरुणांना ही बातमी ऐकून अत्यानंद झाला. एक नवी शाळा स्थापन करण्याबाबत त्यांनी आपापसात आधीच चर्चा केली होती. तरुणांच्या या गटाचे नेतृत्व होते गोपाळ गणेश आगरकर आणि बाळ गंगाधर टिळक यांच्याकडे! १८७९ साली अभ्यासासाठी टिळक काही महिने डेक्कन कॉलेजच्या वसति-गृहात राहात होते. तेथे टिळक व आगरकर यांचा स्नेह जमला. कॉलेजचे 'फेलो' असलेले आगरकर तेव्हा एम. ए. परीक्षेचा अभ्यास करीत होते तर टिळक एलएल. बी. परीक्षेची तयारी करीत होते. परक्या सरकारची चाकरी करावयाची नाही असे दोघांनीही आधीच ठरवले होते. लोकांना शिकवून देशसेवा करण्याची दोघांनीही शपथ घेतली होती. टिळकांशी ओळख होण्याआधीच बरेच दिवस एखादी नवी शाळा स्थापन करण्याबाबच्या योजनेविषयी

आगरकरांनी नातेवाईकांबरोबर व काही मित्रांबरोबर चर्चा केली होती. नव्या शाळेतल्या शिक्षकांच्या त्यागामुळे, ध्येयनिष्ठेमुळे, साध्या राहाणीमुळे व विशेषत: देशभक्तीमुळे विद्यार्थ्यांना स्फूर्ती मिळेल असे आगरकरांना वाटत होते. आगरकर आणि टिळक या दोघांपुढे जेसुइट पंथाच्या खिस्ती धर्मोपदेशकांनी त्यागभावनेने चालवलेल्या संस्थांचा आदर्श होता. विष्णुशास्त्री यांना मात्र जेसुइट पंथीयांच्या संस्थेविषयी आकर्षण वाटत होते असे दिसत नाही.

विष्णुशास्त्री हे आगरकर व टिळक यांच्यापेक्षा वयाने सहा वर्षांनी मोठे होते. शिवाय सर्वश्रेष्ठ तरुण लेखक म्हणून त्यांचा नावलौकिकही पसरला होता. विष्णुशास्त्री यांच्या उत्कट देशभक्तीमुळे आगरकर व टिळक त्यांच्याकडे ओढले गेले. विष्णुशास्त्री, यांच्या राजीनाम्याची वार्ता ऐकून आगरकर व टिळक त्यांना भेटले आणि बाळाजी आबाजी भागवत व व्यंकटेश बाळाजी करंदीकर या मित्रांसह विष्णुशास्त्री यांच्या नव्या शाळेत शिक्षक म्हणून दोघांनीही आपण काम करण्यास तयार आहोत असे सांगितले. या ऐतिहासिक ठरलेल्या भेटीबद्दल भावाला कळवताना विष्णुशास्त्री यांनी १३ सप्टेंबर १८७९ रोजी लिहिलेल्या पत्रात म्हटले,

" १ ऑक्टोबर हा संस्मरणीय दिवस जवळ येत आहे. त्या दिवशी माझ्या पायातील नोकरीच्या बेड्या झुगारून देण्याचे समाधान मला लाभेल. एम. ए च्या परीक्षेस बसणारे रा. आगरकर, एलएल. बी. परीक्षेस बसणारे रा. टिळक आणि बी. ए. परीक्षेची तयारी करीत असलेले रा. भागवत व रा. करंदीकर यांनी माझ्या नव्या उपक्रमात सहभागी होण्याची तयारी दर्शविली आहे. एक जानेवारीस झेंडा फडकावण्याचे आम्ही ठरवले आहे. या तोफखान्यामुळे शाळा तावडतोब भरभराटीस येईल."

त्यांची मूळ योजना काहीशी विस्कटली. का कोण जाणे, भागवत व करंदीकर या दोघांनीही शाळेत शिक्षक म्हणून सहभागी व्हावयाचे नाही असा निर्णय घेतला. आगरकर एम. ए.च्या परीक्षेत अनुत्तीर्ण झाल्याने एम. ए. ची पदवी मिळवल्यानंतर म्हणजे वर्षभराने त्यांनी शाळेत रुजू होण्याचे आश्वासन दिले. त्यामुळे शाळा काढण्याची योजना आखणाऱ्या मंडळींपैकी टिळक एकटे राहिले. त्यांनी मात्र दिलेला शब्द पाळला आणि थोड्या दिवसांच्या विचारानंतर का होईना, १ जानेवारी १८८० रोजी न्यू इंग्लिश स्कूल उघडले तेव्हा पहिल्याच दिवशी टिळक शाळेत रुजू झाले.

*

# ४ : "इतक्या लवकर इहलोक सोडून जाण्याचे त्यांना कारण नव्हते."

एक जानेवारी १८८० रोजी नाना फडणीस यांचे बंधू मोरोबादादा फडणीस यांच्या जुन्या वाड्यात चालू झालेली 'न्यू इंग्लिश स्कूल' ही शाळा पश्चिम भारताच्या शैक्षणिक इतिहासाला वळण देणारी ठरली. चिपळूणकर, टिळक आणि आगरकर यांनी अशी शाळा स्थापन करण्याचे ठरविण्यापूर्वी अनेकांनी इंग्रजी माध्यमाच्या खासगी शाळा चालविल्या होत्या, परंतु आपल्या विद्यार्थ्यांना इंग्रजी भाषा व साहित्य यातील जे जे सर्वोत्कृष्ट ते ते आत्मसात करावयास लावून त्याबरोबरच आपला देश, धर्म व भाषा यावर प्रेम करण्याची प्रेरणा देणाऱ्या प्रतिभावंत तरुणांच्या गटाने स्थापन केलेली व चालवलेली अशी दुसरी शाळा कोणतीही नव्हती. म्हणूनच ज्यांनी देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपले सारे आयुष्य वाहिले अशा काही सर्वश्रेष्ठ देशभक्तांना प्रशिक्षण देणारी शाळा म्हणून कालांतराने ही शाळा ओळखली जाऊ लागली यात नवल नाही.

पहिल्याच दिवशी न्यू इंग्लिश स्कूलच्या पटावर दीडशे विद्यार्थ्यांची नावे होती. ही संख्या लवकरच तीनशेवर गेली. ९ फेब्रुवारी १८८० रोजी विष्णुशास्त्री यांनी आपल्या भावाला कळविले,

"गतवर्षी योजिलेल्या प्रकल्पांपैकी सर्वांत मोठ्या प्रकल्पात मी गढून गेल्यामुळे आणि सर्वच प्रकल्पांना यश आल्याने तुला पत्र लिहिण्यास सवड मिळाली नाही. आता मात्र क्रांतीने कळस गाठला आहे. शाळेत जवळजवळ तीनशे विद्यार्थी आहेत. सर्व शिक्षकवर्गही माझ्या मनाजोगता हवा तसाच आहे. आता मी एकच गोष्ट होण्याची वाट पाहात आहे आणि ती म्हणजे राजमान्य राजश्री कुंटे व साठे येथे केव्हा येतील त्याची!"

आपल्या शाळेत अधिक चांगला सेवकवर्ग आहे आणि सरकारने चालविलेल्या शाळेसकट सर्व शाळांतील हुशार मुले आपण आकृष्ट करून घेऊ शकतो असे विष्णुशास्त्री यांना आपल्या पूर्वीच्या वरिष्ठांना खात्रीपूर्वक पटवून द्यावयाचे होते.

चिपळूणकर व टिळक यांच्याशिवाय शाळेतील शिक्षकांमध्ये महादेव बल्लाळ नामजोशी हे नामवंत पत्रकार व कार्यकर्ते होते. 'डेक्कन स्टार' व 'किरण' या पत्रांचे नामजोशी संपादक होते. ही पत्रे बंद पडल्यानंतर त्यांनी आपला छापखाना बर्वे यांच्याकडे

गहाण टाकला होता. बर्वे यांनी तो नंतर विष्णुशास्त्री व त्यांचे भागीदार यांना विकला होता. नंतर त्यांनी आपला ' आर्यभूषण ' छापखाना काढला. ' श्रीशिवाजी ' या साप्ताहिकाचे संपादक कृष्णराव मांडे हे शाळेच्या शिक्षकवर्गात सामील झालेले आणखी एक पत्रकार! पुढील काळात नाटककार व इतिहासकार म्हणून ख्यातनाम झालेले वासुदेवशास्त्री खरे हेही शाळेतील एक प्रसिद्ध शिक्षक होते.

उन्हाळ्याची सुट्टी सुरू होण्यापूर्वी विष्णुशास्त्री यांनी विद्यार्थ्यांना उद्देशून भाषण केले. शाळेबद्दल निराशावादी मते प्रकट केली जात असताना, शाळा काढण्याच्या कल्पनेचा जाहीरपणे धिक्कार केला जात असताना तसेच ' वेडगळ ', ' निराश ', ' अतिरंजित ', ' अव्यवहारी ' अशा विशेषणांचा मारा होत असतानाही आम्ही शाळा सुरू करण्यात यशस्वी झालो हे त्यांनी मोठ्या अभिमानाने सांगितले. काही लोक सोडून गेले, काहींनी चारित्र्यहनन केले, वृत्तपत्रांनी खोडसाळ व मूर्खपणाचा मजकूर प्रसिद्ध केला, काही क्षुद्र लोकांनी आपले हितसंबंध राखण्यासाठी कारवाया केल्या, निराश झालेल्यांनी आकसाने नीच क्लृप्त्या वापरल्या तरीही आम्ही आपला संकल्प सिद्धीस नेला आहे. विद्यार्थी व शिक्षक यांना दिलेले संपूर्ण स्वातंत्र्य हे या शाळेचे खास वैशिष्ट्य आहे असे वर्णन करून त्यांनी सांगितले,

" दर तासाला फेरी घालून मुख्याध्यापक आपल्यावर नजर ठेवीत आहेत अशी आमच्या शाळेतील शिक्षकास भीती वाटत नाही. शाळातपासनेसाच्या वार्षिक भेटीचा त्याला बागुलबोवा वाटत नाही. प्रत्येक नव्या मुख्याध्यापकाच्या खोडी व लहरी संभाळून त्याप्रमाणे बदलणारे शिष्टाचार पाळण्याचीही आमच्या शाळेत गरज नाही. येथे शिक्षकांना पुस्तके व प्रश्नपत्रिका सादर करणे, रजिस्टर व कॅटलॉग अखंड भरीत राहणे असली निरर्थक कामे करावी लागत नाहीत. एका बाजूने वेळापत्रक व दुसऱ्या बाजूने घड्याळ ज्याच्यावर हुकमत गाजवत आहे अशा जिवंत कळसूत्री बाहुल्याची त्याला येथे कळा आलेली नाही. पोट भरण्यासाठी तथाकथित बुद्धिमंत वरिष्ठाचा प्रत्येक शब्द म्हणजे कायदा मानण्याचे त्याला येथे कारण नाही. वरिष्ठाच्या गर्जनांना घाबरण्याची आणि एखाद्या गुलामाप्रमाणे धन्याच्या चेहऱ्यावरचे बदलते भाव निरखून पाहण्याचीही येथे आवश्यकता नाही. "

कुंटे यांच्यासारख्या वरिष्ठाबद्दल मनात धुमसत असलेला संताप ते अशा तऱ्हेने व्यक्त करीत होते हे उघड आहे. आपल्या शाळेतील शिक्षकांना आपल्या वाट्याला आलेला असला मनस्ताप भोगावा लागू नये अशी त्यांची इच्छा होती.

विद्यार्थ्यांचा बालसुलभ अवखळपणा म्हणजे त्यांनी मुद्दाम केलेले गैरवर्तन असा गैरसमज या शाळेत केला जाणार नाही असे विष्णुशास्त्री यांनी विद्यार्थ्यांना सांगितले. विद्यार्थ्यांच्या त्यांच्या वयाला साजेशा महत्त्वाकांक्षांना उद्धटपणा समजून त्या दडपल्या जाणार नाहीत अशी त्यांनी ग्वाही दिली. विद्यार्थ्यांनी मात्र चिपळूणकरांनी घोषित केलेल्या या दयाळू धोरणाचा गैरफायदा घेतला. विद्यार्थ्यांवर नियंत्रण राखून शाळेत चांगली वर्तणूक व

शिस्त राखणे मुख्याध्यापकांना अशक्य होत असल्याचे लवकरच आढळून आले. मुख्याध्यापकांच्या शिक्षणविषयक प्रगत कल्पना म्हणजे त्यांचा दुबळेपणा अशा गैरसमजामुळे बेशिस्त विद्यार्थ्यांनी विष्णुशास्त्री यांच्या वर्गात गोंधळ घालावयास सुरवात केली. वर्गात प्रचंड गोंधळ चालू असताना विद्यार्थ्यांकडे पाठ फिरवून हातातल्या पुस्तकाचे वाचन करण्यावर लक्ष केंद्रित करण्याखेरीज विष्णुशास्त्री यांना अन्य पर्याय उरला नाही. वर्गात त्रास देणाऱ्या विद्यार्थ्यांचा निषेध म्हणून त्यांनी वापरलेल्या या अहिंसक पद्धतीचा विद्यार्थ्यांवर मुळीच परिणाम झाला नाही. आगरकर टिळकांना अधूनमधून भेटत असत. मुख्याध्यापकाचे काम करण्यास विष्णुशास्त्री योग्य नाहीत हे त्यांच्या लक्षात आले. शाळेतील विद्यार्थी सद्वर्तनी असावेत, त्यांनी शिस्त पाळावी यासाठी खोड्या करणाऱ्या विद्यार्थ्यांना शिक्षा करताना त्या काळात परिचित असलेल्या छडी वापरण्यासारख्या पद्धतींचा वापर करण्यास जो मागेपुढे पाहणार नाही अशा एखाद्या खंबीर माणसाची शाळेला गरज आहे हे टिळक व आगरकर दोघांनीही ओळखले.

आजही संस्कृत-इंग्रजी शब्दकोशाचे कर्ते म्हणून जे ओळखले जातात त्या वामन शिवराम आपटे या संस्कृत पंडिताचे मन वळवण्यात सुदैवाने न्यू इंग्लिश स्कूलच्या संस्थापकांना यश आले. १८८० सालच्या ऑगस्ट महिन्यात आपटे शाळेत रुजू झाले आणि लवकरच शाळेचे अधीक्षक म्हणून काम पाहू लागले. विद्यार्थिदशेतील त्यांचे यश अतिशय वाखाणण्याजोगे होते. संस्कृत व गणित या विषयांतील प्रावीण्याबद्दल त्यांनी अनेक पारितोषिके व शिष्यवृत्त्या पटकावल्या होत्या. नवी शाळा काढण्याच्या बेताबद्दल १८७९ साली टिळक व आगरकर यांची डेक्कन कॉलेजमध्ये वारंवार बोलणी होत असत. तेव्हा आपटेही तेथेच शिकत होते. टिळक व आगरकर यांची योजना आपटे यांना तेव्हा अव्यवहार्य वाटत असे. सार्वजनिक काका या नावाने ओळखल्या जाणाऱ्या गणेश वासुदेव जोशी यांचे आपटे हे जावई होते. सार्वजनिक काका हे महादेव गोविंद रानडे यांचे विश्वासू सहकारी होते. आपटे हे गरीब कुटुंबात जन्मले होते. फार लहान वयात ते आईबापांच्या छत्रास पारखे झाले होते. आईवडील गेल्याने विद्यार्जन पुरे करण्यासाठी त्यांना फार हाल सोसावे लागले. सरकारी शाळेत कायम नोकरी मिळावी असे त्यांना वाटत होते पण तेथे जागा रिकामी नव्हती; म्हणून त्यांनी खिस्ती धर्मोपदेशकांच्या एका शाळेत शिक्षकाची नोकरी पत्करण्याचे ठरवले. न्यू इंग्लिश स्कूलमध्ये रुजू झाल्यानंतर चॅटफील्ड-साहेबांनी देऊ केलेली सरकारच्या शाळेतील नोकरी आपटे यांनी नाकारली. वामनराव आपटे हे निष्णात शिक्षक असून कडक शिस्तीचे भोक्ते होते. ते विद्यार्थ्यांकडून कसोशीने अभ्यास करवून घेत असत. त्यांच्या शिकवण्यामुळे व मार्गदर्शनामुळे पहिल्याच वर्षी त्यांच्या एका विद्यार्थ्याला संस्कृतमधील नैपुण्याबद्दल प्रत्येकाला हवेहवेसे वाटणारे जगन्नाथ शंकरशेट पारितोषिक मिळाले. मॅट्रिकच्या परीक्षेस बसलेल्या पहिल्या तुकडीतील एकूण सोळा विद्यार्थ्यांपैकी बारा विद्यार्थी उत्तीर्ण झाले. एरवी विष्णुशास्त्री व त्यांचे मित्र यांच्यावर टीका करणाऱ्या

मंडळींनाही विद्यार्थ्यांची ही कामगिरी प्रशंसनीय वाटली. १८८० सालच्या अखेरीस एम. ए. परीक्षा उत्तीर्ण होऊन गोपाळराव आगरकही शिक्षक म्हणून शाळेत रुजू झाले.

आतापर्यंत मिळवलेल्या यशात समाधान मानण्यास विष्णुशास्त्री यांचे सहकारी तयार नव्हते. त्यांनी एका नव्या उपक्रमाची योजना आधीच आखली होती. एक इंग्रजी व एक मराठी अशी दोन साप्ताहिके काढण्याचा प्रस्ताव आपल्या सहकाऱ्यांपुढे मांडण्यात नामजोशी यांनी पुढाकार घेतला होता, असे वासुदेवशास्त्री खरे यांनी म्हटले आहे. नामजोशी यांनी यापूर्वी अशा दोन साप्ताहिकांचे संपादन केले होते पण ती पैशाच्या अभावी बंद पडली होती हे लक्षात ठेवावयास हवे. आरंभी विष्णुशास्त्री यांना या योजनेबद्दल फारसा उत्साह वाटत नव्हता. कारण निबंधमालेचा अंक वेळेवर दर महिन्याला काढणे हेच त्यांना अवघड असल्याचे आढळले होते. तरी त्यांनी आपल्या सहकाऱ्यांच्या बेताला मोडता घातला नाही. केसरी या मराठी साप्ताहिकासाठी लेख देण्याचे त्यांनी कबूल केले. 'मराठा' या इंग्रजी साप्ताहिकाच्या संपादनाची जबाबदारी घेण्याचे टिळकांनी मान्य केले तर 'केसरी'चे संपादन करण्याचे आगरकरांनी कबूल केले. टिळक हे मराठ्याचे संपादक असले तरी दोन्ही साप्ताहिकांमध्ये पहिल्या जवळजवळ दहा वर्षांत त्यांनी फारसे लिहिले नाही. लिहिण्याऐवजी दोन्ही साप्ताहिकांची व्यवस्था पाहण्याचे काम आवडीने करणे त्यांना पसंत होते. नामजोशी व आपटे यांनी इंग्रजी साप्ताहिकात वारंवार लिहिले तर आगरकर व चिपळूणकर यांनी मराठी साप्ताहिकासाठी लेखन करणे पसंत केले.

दोन जानेवारी १८८१ रोजी 'मराठा' पत्राचा पहिला अंक प्रसिद्ध केला. अर्ज करणे आणि आवतीभोवतीच्या घडामोडींचा अन्वयार्थ स्पष्ट करणे हे आपले खरे आद्य कर्तव्य असेल आणि सूचना देणे व मार्गदर्शन करणे हे आपल्या कर्तव्याचे दुय्यम अंग असेल असे विष्णुशास्त्री व त्यांचे सहकारी यांनी पहिल्याच अंकात जाहीर केले होते. मराठ्याच्या पहिल्या अंकातील धोरणविषयक जाहीरनाम्याशी मिळताजुळता असा दुसरा जाहीरनामा ४ जानेवारी १८८१ रोजी प्रसिद्ध झालेल्या केसरीच्या पहिल्या अंकातही प्रकाशित करण्यात आला होता. या धोरणविषयक निवेदनाचा मसुदा विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी तयार केला होता. आपल्या साप्ताहिकात बातम्यांपेक्षा दृष्टिकोणाला जास्त महत्त्व दिले जाईल असे त्यांनी या निवेदनात स्पष्ट म्हटले होते. कोणाचेही भय न बाळगता किंवा कोणाचीही मेहेरबानी व्हावी अशी अपेक्षा न धरता पत्रकार म्हणून आपण आपले कर्तव्य करू असेही त्यात म्हटले होते. लोकांच्या वतीने 'जागल्या' म्हणून काम करताना आपण नोकरशहांची दुष्कृत्ये चव्हाट्यावर आणू असे आश्वासनही त्यांनी दिले होते. इतर वृत्तपत्रांपेक्षा आपली वृत्तपत्रे वेगळी असतील आणि त्यात विशेषतः शिक्षण खात्याच्या कारभारासंबंधीचे लेख आणि मराठी पुस्तकांची परीक्षणे प्रसिद्ध होतील असेही सांगण्यात आले

शिक्षणखात्याने प्रकाशित केलेल्या 'नवनीत'च्या सुधारित आवृत्तीचे विष्णुशास्त्री

यांनी केसरीत परीक्षण केले. मध्ययुगीन मराठी कवींच्या काव्यातील निवडक भाग संकलित करून परशुरामतात्या गोडबोले यांनी 'नवनीत' नावाने प्रसिद्ध केला होता. ज्ञानेश्वर व मुकुंदराज या दोन मध्ययुगीन श्रेष्ठ मराठी कवींच्या काव्यातील उतारे मूळच्या नवनीत पुस्तकात परशुरामतात्यांनी निवडले होते. ते सुधारित आवृत्तीतून गाळल्याबद्दल रावजीशास्त्री गोडबोले आणि श्रीकृष्णशास्त्री तळेकर या संपादकांच्या दुकलीस विष्णुशास्त्री यांनी बोल लावला. मेजर कँडी यांच्या शिफारशीनुसार संपादकांनी हे उतारे गाळले आणि त्यास चॅटफील्डसाहेबांनी संमती दिली याबद्दल विष्णुशास्त्री यांनी चॅटफील्डसाहेबांना जबाबदार धरले. १५ व २२ मार्च १८८१ रोजी केसरीत प्रसिद्ध झालेल्या दोन लेखांमध्ये विष्णुशास्त्री यांनी ब्राह्मणांच्या भूमिकेचे समर्थन केले आणि त्यांच्या टीकाकारावर ते तुटून पडले. ब्राह्मणांचे वर्चस्व हे राजकीय तसेच धार्मिक असून महाराष्ट्रातील ब्राह्मणांनी राजकीय सत्ता बळकावली असल्याची त्यांनी कबुली दिली. मात्र 'बळी तो कान पिळी' या न्यायानुसार सामर्थ्यशाली व बुद्धिवान ब्राह्मणांनी इतर लोकांच्या अज्ञानाचा व दुबळेपणाचा फायदा घेणे स्वाभाविकच होते असा त्यांनी युक्तिवाद केला. ब्राह्मणांना शिव्या देण्यात वेळ व्यर्थ दवडण्यापेक्षा ज्या गुणांमुळे ब्राह्मणांना वर्चस्व मिळवता आले ते गुण आत्मसात करण्यावर लक्ष केंद्रित करावे असा त्यांनी ब्राह्मणांच्या टीकाकारांना सल्ला दिला.

२२ मार्च ते १७ मे १८८१ या कालखंडात केसरीत प्रसिद्ध झालेल्या लेखमालेत क्रीडाभुवन व डेक्कन कॉलेज क्लब यासारख्या नव्याने स्थापन झालेल्या मंडळ्या व संस्था यांच्यावर त्यांनी टीका केली. अशा संस्थांतील सभासदांचा कामाबद्दलचा उत्साह एकतर लवकरच मावळतो नाहीतर त्यातील तीव्र गटबाजीमुळे फाटाफूट होते. अशा कलहांमुळे सबंध संघटनेवरच परिणाम होतो व त्यामुळे आपली उद्दिष्टे गाठण्यात संस्थेला अपयश येते असे विष्णुशास्त्री यांना आढळले. २४ मे ते १८ जुलै १८८१ या काळात केसरीत त्यांची दुसरी एक लेखमाला प्रसिद्ध झाली. मराठी ग्रंथोत्तेजक मंडळींच्या कारभाराचा परामर्श त्यांनी या लेखमालेत घेतला होता. मराठी लेखकांना उत्तेजन देणे आणि मराठी भाषेत लिहिलेले स्वतंत्र ग्रंथ प्रसिद्ध करण्यास मदत करणे हे या मंडळीचे हेतू होते. या मंडळीची व्यवस्था समाधानकारक नव्हती आणि तिचे दिवाळे निघेल की काय अशी अवस्था होती. महादेव गोविंद रानडे व गोपाळराव देशमुख ('लोकहितवादी') हे या मंडळीचे संस्थापक होते. संस्थेच्या कारभारात हस्तक्षेप करून त्यांना ती आपल्या हाती घ्यावी लागली होती. मंडळाच्या वर्गणीदारांनी संस्थेसमोरील आर्थिक पेचप्रसंगाबद्दल दोषी ठरविण्याच्या लोकहितवादी व रानडे या जोडगोळीच्या सपशेल चुकीच्या धोरणाबद्दल विष्णुशास्त्री यांनी या दोघांवर परखड टीका केली. विशेषतः काव्यसंग्रह, नाटके व कादंबऱ्या छापण्यास रानडे व लोकहितवादी राजी नसल्याबद्दल त्यांनी या दोघांनाही दोष दिला. परक्या सरकारवर अवलंबून राहण्यापेक्षा स्वावलंबनाची कास धरल्याने मराठी ग्रंथांच्या प्रकाशनाचे काम वाढेल असा विष्णुशास्त्री यांना विश्वास वाटत होता. १८ ऑक्टोबर ते २२ नोव्हेंबर

१८८१ या काळात त्यांनी लिहिलेल्या व केसरीत प्रसिद्ध झालेल्या आणखी एका लेखमालेतही त्यांनी या त्यांच्या आवडत्या विषयाचे पुन्हा विवेचन केले. हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रादेशिक भाषांमध्ये विविध विषयांवरील ग्रंथांचा खजिना असण्याच्या आवश्यकतेवर त्यांनी पुन्हा या लेखमालेत भर दिला.

'अनुकरण' या विषयावर १८८१ साली केसरीत प्रसिद्ध झालेली त्यांची लेखमाला सर्वांत वादग्रस्त ठरली. माणूस हा जात्याच अनुकरणप्रिय प्राणी आहे आणि पूर्वीच्या काळी हिंदूंनी मुसलमानांचे अनुकरण केले ही वस्तुस्थिती त्यांनी मान्य केली. पाश्चिमात्यांचे बालिश व मूर्ख अनुकरण करण्यात धन्यता मानण्याच्या सर्वत्र फैलावलेल्या दुष्प्रवृत्तीवर त्यांनी हल्ला चढवला. चष्मे, हातमोजे, पायमोजे वापरणाऱ्या व गळपट्टे घालणाऱ्या लोकांबद्दल त्यांना तिरस्कार वाटत होता. या वस्तू बायकांनी वापरण्यास हरकत नाही पण पुरुषांनी त्या कधीही वापरू नयेत असे त्यांचे मत होते. चहा किंवा कॉफी पिण्याचीही गरज नाही असे त्यांचे म्हणणे होते. पाश्चिमात्यांचा प्रभाव असलेल्या लब्धप्रतिष्ठित मोजक्या मंडळींपैकी दारूबाजांनी व्यसनालाच प्रतिष्ठा मिळवून दिल्याबद्दल त्यांनी त्यांचा धिक्कार केला. धार्मिक बाबतीत ख्रिस्ती लोकांचे अनुकरण करणाऱ्यांना त्यांनी धारेवर धरले. प्रार्थना समाज व सत्यशोधक समाज या सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करणाऱ्या संस्थांच्या पाठीराख्यांचा तसेच नास्तिकांचा पाश्चिमात्यांचे अनुकरण करण्याबद्दल त्यांनी तीव्र निषेध केला. उत्तम पोशाख केलेल्या आपल्या पत्नीबरोबर उपासनेच्या कार्यक्रमास हजर राहाणाऱ्या आणि समूहगीत म्हणणाऱ्या प्रार्थनासमाजाच्या सभासदांची त्यांनी टिंगल केली. चर्चमधील प्रार्थनेप्रमाणेच अशा सभांनाही खूप गर्दी असते त्याचे कारण खरीखुरी धर्मनिष्ठा नसून लावण्यवती ललनांची स्फूर्तिदायक उपस्थिती हे असते असे त्यांनी सूचित केले आहे.

असल्या अनुकरणावर त्यांनी कडाडून टीका केली तरीही अन्य बाबतीत हिंदी लोकांनी इंग्रजांचे अनुकरण करावे असे त्यांनी आवाहन केले. ज्या गुणांमुळे इंग्लंड हे एक बलाढ्य राष्ट्र बनले आहे ते गुण अंगी बाणविण्याचा सल्ला त्यांनी आपल्या देशवासीयांना दिला. वक्तशीरपणा, कार्यक्षमता, साहसी वृत्ती, देशभक्ती, एकतेची भावना आणि या सर्वांपेक्षाही एखाद्या प्रश्नासंबंधी आपल्याला जे वाटते ते बोलून दाखवण्याचे नैतिक धैर्य आणि दुसऱ्यांना केलेला उपदेश स्वतःही आचरणात आणण्याची वृत्ती या इंग्रजांच्या गुणांची त्यांनी तारीफ केली. या गुणांचा अभाव असेल तर जगातील राष्ट्रांमध्ये एकेकाळी भारताला असलेले अग्रस्थान त्याला परत मिळवता येणार नाही असे त्यांना वाटत होते.

प्रार्थनासमाजाबद्दलच्या त्यांच्या मूळ लेखातील काही भाग केसरीचे संपादक असलेल्या आगरकरांनी गाळला. उपासनेस उपस्थित राहणाऱ्या स्त्रियांबद्दल विष्णुशास्त्री यांनी ज्या तऱ्हेने अनादराने लिहिले होते ते आगरकरांना आक्षेपार्ह वाटले होते. अनेकदा कुचेष्टा करताना लिहिता लिहिता विष्णुशास्त्री वाहवत जात असत. सदभिरुचीला सोडून स्त्रियांबद्दल काही शेरे त्यांनी मूळच्या लेखात मारले असण्याची शक्यता आहे. आपल्या लेखातील

काही भाग संपादकांनी गाळगे त्यांना आवडलेही नाही पण आपल्यापेक्षा वयाने लहान असलेल्या सहकाऱ्याने संपादकीय अधिकार वापरले याबद्दल त्यांनी वादंग माजवले नाही तसेच गाजावाजाही केला नाही.

इतर अनेक प्रश्नांवर केसरीच्या संस्थापकांचे मतभेद असले तरी काही विशिष्ट विषयावर त्यांचे स्थूल मानाने एकमत होते असा केसरीच्या मागल्या अंकांचे काळजीपूर्वक वाचन केले की कोणाचाही ग्रह झाल्याशिवाय राहात नाहीं. बालविवाहासारख्या दुष्ट रूढी-विरुद्ध मोहीम उघडण्याबाबत सर्वांचे एकमत होते असे वाटते. मुलींना शिक्षण देण्यास ते अनुकूल होते पण त्यांना कोणते विषय शिकवावेत तसेच त्यांच्या शाळेत कोणती भाषा माध्यम म्हणून असावी या प्रश्नांबाबत केसरी-मराठा पत्रांच्या संस्थापकांमध्ये एकमत नव्हते. विधवांना पुनर्विवाह करण्यास तत्कालीन समाजात मनाई करण्यात आली होती. या बंदीवर ते टीका करीत असत. कुटुंब या सामाजिक संस्थेत सुधारणा घडवून आणण्याची आवश्यकता आहे याबाबत सर्वसामान्यतः त्यांच्यामध्ये एकमत होते. जातिव्यवस्थेतून विषमता निर्माण होते हे त्यांना मान्य होते, मात्र त्यामुळे ती नष्ट करण्याच्या कार्यक्रमास अग्रक्रम देण्यास ते राजी नव्हते. त्यांच्या मते अर्वाचीन काळात जातिव्यवस्था बरीच कमकुवत झाली असून कालांतराने तिचे दुष्परिणाम नष्ट होतील अशी त्यांना आशा वाटत होती. ब्राह्मणांमधील पोटजातींतील मुला-मुलींचे विवाह घडवून आणण्यास त्यांचा पाठिंबा होता. मात्र आंतर-जातीय विवाहांचा त्यांनी पुरस्कार केला नव्हता. जबरदस्ती करून सामाजिक सुधारणा घडवून आणण्यापेक्षा त्यासाठी लोकांचे मन वळवून त्या आस्ते आस्ते घडवून आणाव्यात यावर त्यांनी भर दिला.

ज्या वादग्रस्त विषयांवर त्यांचे आपापसात मतभेद होते त्या विषयांवर वाद घालून निष्कारण आपली शक्ती खर्च करावयाची नाही असा त्यांच्यात अलिखित करार झाला असावा. त्यामुळे स्वेच्छेने घालून घेतलेले हे बंधन कोणी धाब्यावर बसवताना दिसला तर इतर त्याला निःसंकोचपणे मागे खेचीत असत. आगरकर हे केसरीचे संपादक असूनही त्यांच्या भाषणावर केसरीनेच प्रतिकूल भाष्य केलेले पाहून वाचकांची चांगलीच करमणूक झाली. आगरकरांच्या अज्ञेयवादाशी तसेच धर्मसुधारणाविषयक त्यांच्या जहाल मतांशी त्यांचे अन्य सहकारी सहमत आहेत असा वाचकांचा समज होऊ नये म्हणून हे भाष्य खुद्द विष्णुशास्त्री यांनीच केले होते हे उघड आहे.

डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी दरवर्षी स्नेहसंमेलन आयोजित करीत असत तेव्हा त्या समारंभास प्रतिष्ठित पुढारी हजर राहात असत. १२ मे १८८१ रोजी या निमित्ताने 'हिंदुधर्म व त्याचा विस्तार' या विषयावर नीळकंठ जनार्दन कीर्तने यांनी मराठीत व्याख्यान दिले. धर्मसुधारणा घडवून आणण्यासाठी प्रार्थना समाजासारख्या संस्था स्थापण्याची गरज नाही असे त्यांचे मत होते. या व्याख्यानानंतर लगेच कुंटे व रानडे यांच्यामध्ये कडाक्याची चर्चा झाली. कुंटे हे कीर्तने यांच्या मताशी सहमत होते. याउलट रानडे यांनी धर्म-

सुधारणेच्या सर्व चळवळींची हिरिरीने तरफदारी केली. या कडाक्याच्या वादामुळे उत्तेजित होऊन आगरकरही वादाच्या रणधुमाळीत उतरले. धर्म व देव यावरील श्रद्धेने मानव-जातीचे काहीच भले झाले नाही याची आगरकरांनी दोघांनाही आठवण करून दिली. संघटना करणे हाच त्यावरील रामबाण उपाय असे आगरकरांचे म्हणणे होते. लोकहितवादी या सभेचे अध्यक्ष होते. त्यांनी आगरकरांच्या मताचे खंडन करण्याचा प्रयत्न करून कीर्तने व कुंटे यांना दुजोरा दिला. मानवी जीवनातील धर्माचे स्थान या विषयावरील वादात पडण्याची केसरीला इच्छा नसल्याने कोणत्याही भाषणावर केसरी टीका करणार नाही असे विष्णुशास्त्री यांनी त्याबाबतच्या संपादकीय टिप्पणीत स्पष्ट केले. मात्र आगरकरांच्या भाषणाच्या संदर्भात त्यांनी वापरलेल्या ' धीट गर्वोक्ती ' व ' अप्रयोजक ' या विशेषणांवरून विष्णुशास्त्री यांना आगरकरांचे भाषण पसंत पडले नव्हते हे स्पष्ट दिसते. सार्वजनिक सभेतील केसरीच्या संपादकांच्या भाषणावर केसरीनेच प्रतिकूल भाष्य करणे हे निश्चितच विचित्र दिसले. त्याहीपेक्षा नवलाची गोष्ट म्हणजे यानंतर काही आठवड्यांच्या आतच प्रार्थनासमाजाची टर उडवण्याचा मोह खुद्द विष्णुशास्त्री यांनाच आवरता आला नाही आणि सर्वानुमते स्वीकारलेल्या आचारसंहितेचे पालन करण्यात त्यांनाही अपयश आले !

शेक्सपियर, भवभूती व कालीदास यांच्यावरील आगरकरांच्या लेखामुळे चांगलेच वादळ उठले. कारण कवी व नाटककार म्हणून भवभूती व कालीदास या दोघांपेक्षा शेक्स-पियर अधिक श्रेष्ठ आहे असे त्यांनी म्हटले होते. भवभूती आणि कालीदास या दोन संस्कृत कवींमध्येही त्यांना भवभूती जास्त पसंत होता. या लेखामुळे खवळलेल्या कालीदासाच्या चाहत्यांनी केसरीकार्यावर पत्रांचा मारा केला. त्यांच्यापैकी एकाने आपल्या मताला पुष्टी देण्यासाठी विष्णुशास्त्री यांनी लिहिलेल्या संस्कृत कविपंचकावरील निबंधाचा हवाला देऊन आगरकरांनी या बाबतीत विष्णुशास्त्री यांचे मत ग्राह्य धरावे अशी सूचना केली. आगरकरांनी या सर्व सूचनांकडे दुर्लक्ष केले आणि उत्तरात आपले विचार पुन्हा एकदा टासून मांडले. न्यू इंग्लिश स्कूलच्या संस्थापकांनी एकत्रित येऊन साप्ताहिकांचा हा सामूहिक उपक्रम चालवला आहे आणि अनेक प्रश्नांवर त्यांचे मतभेद आहेत हे अशा प्रसंगी केसरीच्या वाचकांना जाणवत असे.

निबंधमालेच्या व्यासपीठाचा सर्वतोपरी वापर करण्याची मोकळीक मात्र फक्त विष्णु-शास्त्री यांनाच होती. देशी वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करणारा लॉर्ड लिटनचा कुविख्यात वृत्तपत्र-विषयक कायदा लॉर्ड रिपन या उदारमतवादी गव्हर्नर–जनरलने १८८१ च्या मार्चमध्ये रद्द केला. ' मोरोपंतांची कविता ' किंवा ' लोकहितवादी ' या निबंधात विष्णुशास्त्री यांनी ख्रिस्ती धर्मोपदेशक व इंग्रज सरकार यांच्यावर आडवळणाने टीका केली होती तसे करण्याची त्यामुळे आवश्यकता राहिली नाही. विष्णुशास्त्री यांनी आता निबंधासाठी उघड-उघड राजकीय विषय निवडला आणि ' आमच्या देशाची स्थिती ' हा दीर्घ निबंध लिहिला. निबंधमालेचे आठ अंक ( क्र. ७७ ते ८४ ) या निबंधाने व्यापले. या स्फूर्तिदायक निबंधात

परतंत्र देशाच्या अवस्थेचे विश्लेषण केलेले होते. कालांतराने राष्ट्रवादी चळवळीस गती आल्यावर १९१० च्या वृत्तपत्रविषयक कायद्यानुसार सरकारने हा निबंध जप्त केला. दुर्दैवाने, निबंधमालेसाठी विष्णुशास्त्री यांनी लिहिलेला हा अखेरचा निबंध ठरला. कारण १८८१ सालच्या अखेरीस शाळेच्या तसेच चित्रशाळा, किताबखाना, आर्यभूषण छापखाना यांच्या संबंधीच्या कामाच्या वाढत्या व्यापामुळे निबंधमालेचे प्रकाशन बंद करण्याचा शास्त्रीबुवा यांनी निर्णय घेतला.

१८८१ च्या डिसेंबरमध्ये त्यांनी ‘ काव्येतिहाससंग्रह ’ या नियतकालिकाबरोबरचे संबंध तोडले. कारण मासिकाच्या व्यवस्थापनाबद्दल साने व मोडक या भागीदारांबरोबर त्यांचे मतभेद झाले. मात्र या काळात लिहिलेल्या त्यांच्या पत्रामध्ये कसलाही कडवटपणा आढळत नाही. आपण जे मिळविले त्याबद्दल त्यांना समाधान वाटत होतेच. शिवाय उज्ज्वल भविष्यकाळाकडेही त्यांचे डोळे लागले होते. गृहआघाडी शांत असल्याने आणि घरातील भांडणाऱ्या दोन गटांमध्ये चकमकी होत नसल्याने विष्णुशास्त्री फार आनंदात होते.

२८ डिसेंबर १८८१ रोजी धाकट्या भावाला लिहिलेल्या पत्रात त्यांनी म्हटले, “ आई लवकरच रामेश्वरला जाणार आहे. तिच्या यात्रेच्या खर्चातील तुझा वाटा म्हणून पन्नास रुपये पाठवून दे. माझे चांगले चालले आहे. काव्येतिहास संग्रह, शिवाजी (तसबीर), दोन्ही छापखाने, शाळा व दुकान याबाबतचे व्यवहार माझ्या मनाप्रमाणे समाधानकारकरीत्या पार पाडले आहेत. फक्त सातशे रुपये घेऊन कालच मी काव्येतिहास संग्रहापासून कायमची फारकत घेतली... इतर फॅशनेबल लोकांबरोबर आपले काकाही ( सीतारामपंत ) बडोद्यास गेले होते. दुसरे मामा ( काशीनाथपंत ) ही दौऱ्यावर गेले आहेत. आईदेखील लवकरच यात्रेला जाईल. सौभाग्यवतीची तब्बेत उत्तम आहे. बारीच्या सहवासात सुपे येथे घालवलेले काही दिवस तिला चांगलेच मानवले आहेत. म्हणूनच तू तिच्या प्रकृतीची काळजी करू नकोस. वरील हकीकतीवरून मला नाताळची सुट्टी शांतपणे सुखात घालविता येईल आणि कशामुळे मला शांतता अनुभवता येईल हे तुला समजेलच. मी तुला बऱ्याच दिवसांत पत्र पाठविले नाही अशी तू तक्रार केल्याचे आईकडून कळले. त्याचप्रमाणे अलीकडच्या तुझ्या पत्रावरून आई आणि मामा यांची तू मनधरणी, मिनतवारी करीत असल्याचे दिसते. मला या दोन्ही गोष्टी मान्य नाहीत. तू चूक करीत आहेस असा तुला इशारा देण्याची संधी मी या पत्राने घेत आहे. महत्त्वाच्या घडामोडींचा अभाव वेळेची कमतरता ह्याखेरीज माझ्या पत्र न लिहिण्याचे अन्य कारण नाही. घरातील अनेक ज्वालामुखी थंड होऊन पत्रव्यवहार करण्यासाठी आपल्याला लवकरच निवांत वेळ मिळेल. गेल्या तीन वर्षांत माझी परिस्थिती किती बिकट झाली होती याची तुला केवळ अंधुक कल्पना असेल. आपल्यावर तोफा डागणाऱ्या दोन परस्परविरोधी गटांना मोडून काढण्यात आणि अनिच्छेने का होईना त्यांच्याकडून मान मिळविण्यात मला यश आले आहे. इतके दिवस धुमसणारी आग

एकदम विझेल असे मात्र तू समजू नकोस. उदाहरणार्थ आपल्या काकांनी विभक्त होण्याचा व मिळकतीतील वाटा मागण्याचा ठाम निर्णय घेतला असल्याचे कानावर येत आहे. असे असेल तर त्यांच्या याबाबतच्या कल्पना काय आहेत ते मला कळव."

१ जानेवारी १८८२ रोजी न्यू इंग्लिश स्कूलचा वार्षिक बक्षीस समारंभ पार पडला. महादेव गोविंद रानडे यांनी विद्यार्थ्यांना उद्देशून भाषण केले आणि आपल्या शिक्षकांच्या त्यागी वृत्तीचे विद्यार्थ्यांनी अनुकरण करावे असा सल्ला दिला.

१५ जानेवारी १८८२ रोजी आपल्या एकत्र कुटुंबातील सर्व स्त्रियांचे एक छायाचित्र घेण्यासाठी घरी त्यांनी एका पोर्तुगीज छायाचित्रकाराला बोलावले होते. दुसऱ्या दिवशी कुटुंबातील सर्व पुरुष मंडळींचे छायाचित्र काढून घ्यावे म्हणून कँप भागातील त्या छायाचित्रकाराच्या घरी ते गेले. छायाचित्रकाराने विष्णुशास्त्री यांचेच एक वेगळे छायाचित्र घ्यावे असे त्यांच्या काही नातेवाईकांनी सुचवले. त्यासाठी छायाचित्र घेण्याची तयारी होईपर्यंत विष्णुशास्त्री यांना बराच वेळ उन्हात उभे राहावे लागले. त्यांना कदाचित ऊन सहन झाले नसावे. ते घेरी येऊन जमिनीवर कोसळले आणि त्यामुळे त्यांना थोडी दुखापतही झाली. त्यामुळे ते खूप दिवस आजारी पडतील आणि अखेर या आजारात ते कालवश होतील असे मात्र कोणालाच वाटले नाही. अनेक आठवडे ते तापाने फणफणत होते. ताप न उतरल्याने त्यांना घरातच पडून राहावे लागले.

याच काळात टिळक आणि आगरकर हे दोघे त्यांच्यावर कोल्हापूरचे माजी कारभारी महादेव वामन बर्वे यांनी भरलेल्या अब्रूनुकसानीच्या खटल्यात बचावाची तयारी करण्यात गढून गेले होते. १८७० च्या जूनपासून कोल्हापूरचे अवघ्या नऊ वर्षांचे महाराज चौथे शिवाजी यांच्यावतीने बर्वे संस्थानचा कारभार पाहात होते. बर्वे हे एक कार्यक्षम व कडक प्रशासक होते पण अनेक कारणांमुळे ते लोकांत फार अप्रिय झाले होते. ते गर्विष्ठ होते व अरेरावीने वागत असत. आपल्या धन्यालाही, त्या बाळराजालाही, ते योग्य तो मान देत नसत. संस्थानाबाहेरच्या ब्राह्मणांच्या ते नेमणुका करीत असल्याने संस्थानचे रहिवासी असलेल्या ब्राह्मणांनाही ते आवडत नसत. १८७९ सालापासून 'इंदुप्रकाश' व 'नेटिव ओपिनियन'सारखी वृत्तपत्रेही त्यांच्या धोरणावर टीका करू लागली. राजाच्या वाढत्या वेडाचाराबद्दल वृत्तपत्रांनी बर्वे यांना जबाबदार धरले. बर्वे आणि त्यांच्या विश्वासू सेवकांनी वाईट वागणूक दिल्याने होणारा मनस्ताप चौथ्या शिवाजी राजास सहन होत नव्हता अशी लोकांची समजूत होती. बर्वे यांच्याविरुद्ध अन्य वृत्तपत्रांनी आधीच उघडलेल्या आघाडीत १८८१ सालच्या मार्चपासून मराठा व केसरी ही पत्रेही सामील झाली.

१८८१ साली बर्वे यांच्यावर जळजळीत टीका करणारा संपादकीय मजकूर दोन्ही साप्ताहिकांत प्रसिद्ध झाला. बर्वे यांच्या विरुद्धच्या या मोहिमेपासून विष्णुशास्त्री दूर राहिले आणि ही झुंज घेण्याचे काम त्यांनी आपल्या तरुण सहकाऱ्यांवर सोडून दिले. १५ जानेवारी १८८२ रोजी 'मराठा' पत्राने मुळात 'ज्ञानप्रकाश'मध्ये प्रसिद्ध झालेली आणि बर्वे

यांच्या हातची समजली जाणारी काही पत्रे पुनर्मुद्रित केली. १७ जानेवारी १८८२ च्या अंकात केसरीने ही वादग्रस्त पत्रे पुनर्मुद्रित केली आणि सरकारने बर्वे यांना टीकाकारांवर खटला भरण्याची परवानगी द्यावी असे सुचवले. बर्वे यांनी बदनामी झाल्याचा दावा गुदरल्यास आपण बदनामी केल्याच्या आरोपातून निर्दोष ठरू इतका पुरेसा पुरावा आपल्याजवळ आहे अशी टिळक व आगरकर या दोघांनाही खात्री वाटत होती असे स्पष्ट दिसते. ज्ञानप्रकाशातून उद्धृत केलेली बर्वे यांच्या हातची वाटणारी पत्रे बनावट होती हे त्यांना माहीत नव्हते. कोल्हापूरच्या राजघराण्यातील काही मंडळी ऐनवेळी कच खातील आणि खटल्यात आपल्या वतीने साक्ष देण्यास नकार देतील असेही त्यांना वाटले नव्हते.

छत्रपती शिवाजीचे वारस असलेल्या कोल्हापूरच्या महाराजांबद्दल महाराष्ट्रातील लोकांना नेहमीच आदर वाटत असे. कोल्हापूरच्या दुर्दैवी चौथ्या शिवाजी राजाची बाजू धैर्याने उचलून धरल्याबद्दल म्हणूनच लोकांनी टिळक व आगरकर यांचे कौतुक केले. १८८२ च्या फेब्रवारी महिन्यात खटला सुरू झाला तेव्हा विद्यार्थ्यांनीही बचावासाठी उभारलेल्या निधीस हातभार लावला. फिरोजशहा मेथा व काशीनाथपंत तेलंग हे दोघे बचावपक्षाचे वकील होते. या खटल्यामुळे सबंध फेब्रुवारी महिन्यात टिळक व आगरकर गुंतून पडले होते. मात्र आजारी असले तरीही विष्णुशास्त्री शाळा व दोन्ही साप्ताहिके यांचे काम पाहू शकतील अशी त्यांना आशा वाटत होती.

५ मार्च १८८२ रोजी भावाला लिहिलेल्या पत्रात विष्णुशास्त्री यांनी म्हटले,

" आई अजून यात्रेहून परतलेली नाही. मात्र ती आठवड्याभरात येईल असे वाटते... सध्या न्यायालयासमोर असलेल्या खटल्याचा काही तपशील सर्वांना ठाऊक आहेच. खटल्याचे कामकाज चालू असताना आणखीही काही तपशील उघडकीस येईल. मात्र व्यक्तिशः या प्रकरणाशी माझा फारच थोडा संबंध आहे. टिळक व आगरकर यांनीच मुख्यतः या प्रकरणाची चौकशी केली असून त्यांनीच त्याला तोंड फोडले आहे. या प्रकरणात यश येण्याची चांगलीच शक्यता आहे. मात्र काय होईल ते पाहावे आणि त्यासाठी थांबावे हेच अधिक योग्य होईल."

" सध्या मी काहीसा आजारी आहे. ते वगळता काही दिवसांपूर्वी ज्या वातावरणाबद्दल मी तुला लिहिले होते ते मी अजूनही अनुभवतो आहे. ज्ञानप्रकाशाच्या कामामुळे एका गोटात सामसूम आहे तर यात्रेमुळे दुसऱ्या गोटात शांतता आहे. दुसऱ्या पक्षातील काशीनाथपंतांचे कार्यालय जेव्हा पुण्यात असते तेव्हा ते अधूनमधून येथे तळ देतात. पण आईचा मुक्काम येथे नसतो तेव्हा अर्थातच तेही स्वस्थ बसतात. त्यांचा उद्धटपणा आणि दुसऱ्यांशी खल्बते करणे अर्थातच पूर्वीसारखेच चालू आहे. पण ते फारसे अपायकारक नाही. सध्या ते एका अनोख्या सृष्टीत वावरत आहेत. ती संपूर्णपणे नवी

आहे. मी जे जग निर्माण करीत आहे त्यात या लब्धप्रतिष्ठितांचे स्थान अगदीच नगण्य आहे... सारांश, येथे सारे सुरळीत व ठीक चालले आहे."

मार्चच्या दुसऱ्या आठवड्यात त्यांची आई यात्रेहून परतली. विष्णुशास्त्री जरी थकलेले व आजारी दिसले तरी त्यांची प्रकृती लवकरच चिंताजनक होईल असे त्यांच्या नातेवाईकांपैकी कोणासही वाटले नाही. १६ मार्च रोजी ताप चढल्यामुळे त्यांना वात झाला आणि सीतारामपंतांना उद्देशून ते ओरडले, "काका, तुम्ही माझ्याकडे धाव घ्या. मी मरतो आहे. मला एक पाण्याचा घोट द्या; पाण्याचा घोट!" डॉक्टर विश्राम रामजी घोले जेव्हा त्यांना तपासण्यासाठी आले तेव्हा विष्णुशास्त्री म्हणाले, "मी तुमचे औषध घेणार नाही. मला कोणी विष पाजू नये. काळजी घ्या. तुम्हांला याचा जाब द्यावा लागेल. हे कोल्हापूरच्या महाराजांचे प्रकरण आहे." १७ मार्च १८८२ रोजी पहाटेच त्यांचे निधन झाले.

त्यांचा मृत्यू इतका आकस्मिक होता की कोल्हापूर प्रकरणामुळे त्यांनी आत्महत्या केली अशी अफवा पसरली. अंत्यसंस्कारापूर्वी पोलीस मरणोत्तर तपासणीचा आग्रह धरतील अशी भीती होती. केरूनाना छत्रे व बाबा गोखले यांच्यासारख्या सरकारदरबारी वजन असलेल्या मंडळींनी डॉ. घोले यांनी दिलेले वैद्यकीय प्रमाणपत्र सादर केले आणि विष्णुशास्त्री यांना नैसर्गिक मृत्यू आला याबद्दल पोलिसांची खात्री पटवली. नंतर पोलिसांनी विष्णुशास्त्री यांचा मृतदेह स्मशानात दहनासाठी नेण्याची परवानगी दिली. विष्णुशास्त्री यांच्या एका चुलत भावाने शवास अग्नी देण्यापूर्वी रामभाऊ साने या विद्यार्थ्याने त्यांना श्रद्धांजली वाहिली. पोलिसांनी आणखी त्रास देऊ नये म्हणून अंत्यविधी घाईघाईने उरकण्यात आले.

त्यांच्या अकाली मृत्यूच्या बातमीने त्यांचे सहकारी व विद्यार्थी यांना जबरदस्त धक्का बसला. मराठीतील सर्वश्रेष्ठ कादंबरीकार म्हणून पुढल्या काळात गाजलेले हरी नारायण आपटे हे शोकाकुल विद्यार्थ्यांपैकी एक होते. त्यांनी 'शिष्यजनविलाप' नावाची एक विलापिका लिहिली. विष्णुशास्त्री यांच्या शिकवण्यामुळे नव्हे तर त्यांच्या लिखाणामुळे प्रभावित झालेल्या विद्यार्थ्यांच्या भावना त्यात स्पष्ट उमटल्या आहेत. विष्णुशास्त्री यांच्या झणझणीत टीकेचे वारंवार लक्ष्य बनलेल्या अनेकांना त्यांच्या आकस्मिक मृत्यूमुळे तीव्र दुःख झाले. ज्याच्याबद्दल फार मोठ्या अपेक्षा बाळगल्या होत्या अशा एका व्यक्तीची कारकीर्द काळपुरुषाच्या थंडगार हातांनी संपवली होती असे त्यांना वाटले. ही बातमी समजली तेव्हा महादेव गोविंद रानडे मुंबईत होते. या बातमीने धक्का बसल्यामुळे ते म्हणाले, "इतक्या लवकर इहलोक सोडून जाण्याचे त्यांना कारण नव्हते."

१६ मे १८८२ रोजी लंडन येथे प्रसिद्ध होणाऱ्या 'ग्राफिक' या वृत्तपत्राने त्यांचा मृत्युलेख प्रसिद्ध केला होता. त्यात म्हटले होते,

"गेल्या १७ मार्चला वयाच्या अवघ्या बत्तीसाव्या वर्षी हिंदुस्थानचा हा सुपुत्र

मृत्युमुखी पडला. अनेक चांगल्या हेतूंच्या पूर्तीसाठी त्यांनी दाखविलेली धडाडी व उत्साह हा कोठल्याही देशात विरळाच असतो. जेथे लोकांची प्रवृत्ती कोणत्याही सुधारणेसाठी सरकारवर विसंबून राहण्याची असते अशा हिंदुस्थानसारख्या देशात तर हे गुण फार मोलाचे असतात. आपल्या परिश्रमांची फळे पाहण्यासाठी ते जगले नाहीत. तरीही प्रगतीसाठी झटणाऱ्यांमधील अग्रेसर म्हणून त्यांना मनापासून मान्यता मिळणे योग्य ठरेल. अशा लोकांची संख्या वाढली तर त्यांच्यामुळेच कधीतरी हिंदुस्थान हा स्वतंत्र बनेल. "

*

# ५ : निबंधमाला आणि अन्य लेखन

निबंधमाला ही मराठी साहित्यातील आधुनिक काळाची नांदीच होती. इंग्रजी राजवटीतील मराठी लेखकाचा हा पहिला मोठा ग्रंथ आहे याबद्दल मराठी साहित्याच्या इतिहासकारांचे एकमत आहे. निबंध, कादंबरी, काव्य व नाटक अशा विविध वाङ्मयप्रकारांची अभूतपूर्व वाढ ज्या कालखंडात झाली त्या कालखंडाचा आरंभ निबंधमालेपासून झाला. विष्णुशास्त्री हे मराठी साहित्यातील पहिले थोर निबंधकार आहेत असे मराठी साहित्याचे इतिहासकार समजतात. चरित्रकार व साहित्यसमीक्षक म्हणूनही त्यांनी मिळविलेल्या यशाची साहित्याचे इतिहासकार प्रशंसा करीत असतात. निबंधमालापूर्व काळास ' भाषांतराचे युग ' म्हटले जाते तर निबंधमालेनंतरचा कालखंड आधुनिक मराठी साहित्यातील पहिला महान सर्जनशील कालखंड मानण्यात येतो. एकदा, विष्णुशास्त्री आपल्या धाकट्या भावाला म्हणाले होते, " मी मराठी भाषेचा शिवाजी आहे. माझ्या तोलाचा आधीच्या पिढीतही कोणी नव्हता; पुढच्या पिढीतही कोणी असणार नाही. " स्वतःबद्दल अफाट कल्पना असलेल्या अहंकारी माणसाने आपल्याबद्दल अशी शेखी मिरविली नसून हा त्यांचा वाजवी दावा होता याबद्दल मराठी साहित्याच्या इतिहासकारांमध्ये एकमत आहे. मात्र विष्णुशास्त्री यांचा हा दावा त्यांच्या समकालीनांना अतिशयोक्तीचा वाटला असणार !

१८६५ साली महादेव गोविंद रानडे यांना १८६४ सालाच्या अखेरपर्यंत प्रकाशित झालेल्या मराठी पुस्तकांबाबत अहवाल सादर करण्यास मुंबई सरकारने सांगितले होते. इंग्रजी राजवट सुरू झाल्यापासून ६६१ मराठी पुस्तके तोपर्यंत प्रसिद्ध झाली होती. त्यांपैकी ४३१ पुस्तके गद्य होती तर उरलेल्या पुस्तकांत पद्ये किंवा कविता होत्या असे रानडे यांनी केलेल्या मराठी वाङ्मयाच्या आढाव्यावरून स्पष्ट झाले. बरीचशी मराठी पुस्तके मूळ इंग्रजी पुस्तकांची भाषांतरे किंवा रूपांतरे होती. पाठ्यपुस्तके, शास्त्रीय विषयांवरील पुस्तके तसेच कायद्यांचे संक्षिप्त अहवाल यातून वगळले तर एकूण मराठी पुस्तकांची संख्या काही फार नव्हती. आढाव्यात ज्याचा खास निर्देश करावा असा इतिहासासंबंधीचा एकही स्वतंत्र ग्रंथ तोपर्यंत प्रकाशित झाला नव्हता असे रानडे यांनी म्हटले आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी ' अरेबियन नाइट्स'चे केलेले उत्कृष्ट भाषांतर वगळले तर इतर भाषांतरांचा दर्जा समाधानकारक नव्हता. चरित्रे व प्रवासवर्णने यांची गुणवत्ताही फार सुमार होती. मासिकांची गुणवत्ताही खालावत असल्याचे रानडे यांना दिसले. आधुनिक काव्य व नाटक हे प्रकार

विकसित झाले नव्हते तर वाङ्मयप्रकार म्हणून कादंबरीची वाढ नुकती कोठे सुरू झाली होती. मराठी साहित्यक्षेत्राचा आढावा घेताना रानडे यांनी अभिप्राय दिला :

" सबंध वाङ्मयाचे चित्र जसे दिसते तसे पाहिले तर ते फारसे समाधानकारक नाही हे खरे ! गतकाळातील यशापेक्षा भविष्यकाळात भरभराट होण्याची शक्यता लक्षात घेऊन सध्या मराठी भाषेने गाठलेल्या प्रगतीच्या टप्प्याचे आपण स्वागत करावयास हवे. आधीचा कालावधी फार थोडा होता हे पाहिले आणि विशेषत: मुंबई इलाख्यातील अन्य भाषांचे सापेक्ष दारिद्र्य लक्षात घेतले तर मराठीत आजवर इतके कार्य झाले याचेच आश्चर्य वाटते."

इंग्रजी राजवटीच्या काळातच मराठी गद्याचा विविध अंगांनी विकास झाला. इंग्रजी राजवटीपूर्वीच्या काळात मराठी वाङ्मयक्षेत्रावर काव्याने हुकमत गाजवली. वाङ्मयप्रकार म्हणून निबंध माहीतच नव्हता. इंग्रजी राजवटीच्या आरंभीच्या काळात लोकहितवादी, श्रीमती फेरार, बाबा पदमनजी, गोविंद नारायण माडगावकर व दादोबा पांडुरंग यांनी निरनिराळ्या विषयांवर निबंध लिहिले. मात्र त्यांच्यापैकी कोणालाही निबंध या वाङ्मय-प्रकाराचे सखोल ज्ञान होते असे दिसत नाही. त्यांचे निबंध वाचताना लेखकासमोर काही निश्चित योजना होती असा ग्रह होत नाही. त्यांच्या निबंधातील विषयांतरामुळे वाचक वैतागत तसेच निबंधातील मुख्य युक्तिवादाच्या पुनरुक्तीमुळेही ते अनेकदा कंटाळत असत. निबंधमालापूर्व काळातील निबंधांचा संक्षिप्तपणा हे जरी त्यांचे खास वैशिष्ट्य असले तरी विचार व भाषा यांच्या दृष्टीने ते निबंध विस्कळीत होते. निबंधमालेत प्रत्ययास येणारी, समृद्ध व समर्पक वर्णने यांच्यामुळे निबंधमालेने वाचकांना आकृष्ट करून घेतले यात नवल नाही. वाचकांनी विष्णुशास्त्री यांच्या निबंधांतल्या भव्यतेची नेहमीच तारीफ केली.

त्यांचा प्रखर राष्ट्रवाद आणि धार्मिक व सामाजिक प्रश्नाबाबतची परंपरानिष्ठ विचार-सरणी यामुळे वाचकांना त्यांच्या निबंधांची भुरळ पडली. ' आमच्या देशाची स्थिती ' कशी आहे याचे विश्लेषण करताना त्यांनी आत्मविश्वासाने जाहीर केले, " आमच्या देशास काहीएक झाले नाही. त्याची नाडी अद्याप साफ चालत असून शरीरप्रकृतीस म्हणण्या-सारखा कांहीएक विकार नाही. यास्तव आमच्या अर्वाचीन पंडित मंडळींनी डाक्तरी पद्धतीस अनुसरून एकावर एक जालीम दवे सुरू करून व शस्त्रक्रियेचे तीव्र प्रयोग करून त्याची जी हळाखी मांडली आहे व विनाकारण विटंबना आरंभिली आहे, ती सर्व सोडून देऊन साधारण पौष्टिकाचे उपचार त्याजवर सुरू झाले असता तो लवकरच पुनः पहिल्यासारखा सशक्त व तेजस्वी होईल याविषयी आम्हांस बिलकूल संशय नाही. हल्ली जी आमच्या राष्ट्रास विपत्तीची स्थिती प्राप्त झाली आहे ती आमच्या अंगच्या अनिवार्य दोषांमुळे झाली नसून ती यदृच्छेने कोणत्याही देशास येण्यासारखी आहे व आजपर्यंत आलीही आहे. इंग्रज लोक हे आम्हाहून अनेक प्रकारांनी बलिष्ट असल्यामुळे व आमचे दैव फिरल्यामुळे हल्लीच्या अवस्थेत आम्ही येऊन पडलो आहो— कालगती विचित्र आहे. "

प्रगतीच्या संकल्पनेवर विष्णुशास्त्री यांचा विश्वास नव्हता. जगात होणारे बदल हे

चक्राकार पद्धतीने होतात असे परंपरानिष्ठ हिंदू माणसाप्रमाणे त्यांनाही वाटत होते. सतत फिरत असणाऱ्या कालचक्राची प्रतिमा ते वारंवार वापरीत असत. एकेकाळी संपूर्ण जगावर वर्चस्व गाजवणारा देश काळाच्या ओघात पूर्णपणे विपन्नावस्थेला पोचतो. मात्र राखेतून जिवंत होणाऱ्या फिनिक्स पक्षाप्रमाणे तो पुन्हा उदयाला येतो आणि पूर्वी सारे वैभव व प्रतिष्ठा त्याला प्राप्त होते. या तर्कशास्त्रानुसार भारतालाही उज्ज्वल भविष्यकाळ आहे.

विष्णुशास्त्री यांच्या मते इंग्रजी राजवट हेच आपल्या दारिद्र्याचे मूळ कारण होते. इंग्रज येण्यापूर्वी आपला देश संपन्न होता आणि मुसलमानांची तथाकथित जुल्मी राजवटही इंग्रजी राजवटीपेक्षा शतपटीने चांगली होती असे त्यांचे मत होते. इंग्रज हे लष्करीदृष्ट्या अत्यंत शक्तिशाली होते आणि त्यांच्याजवळ अत्याधुनिक शस्त्रे असल्यामुळे त्यांच्याविरुद्ध सशस्त्र लढा करून स्वातंत्र्य मिळविण्याचा विचारही भारतीयांना करणे शक्य नव्हते, हे त्यांना मान्य होते. म्हणूनच बराच काळ भारतीयांना मन वळविण्याच्या पद्धतीवरच विसंबावे लागेल, असे त्यांचे म्हणणे होते. आपल्या राष्ट्राच्या महानतेची भारतीयांना जाणीव करून देण्यावर त्यांनी भर दिला. राष्ट्रीयत्वाची जाणीव वाढविण्यासाठी छापखाने, तारायंत्रे, आगगाड्या व आगबोटी या दळणवळणाच्या व वाहतुकीच्या आधुनिक साधनांचा सामर्थ्यशाली हत्यारासारखा उपयोग करून घ्यावा असे त्यांनी सुचवले. लोकांना शिक्षण देणे आणि आपल्या अधिकाराबद्दल त्यांच्यात जागृती निर्माण करणे अतिशय आवश्यक आहे असे ते सांगत असत.

हिंदू धर्म व समाज यांच्यात सुधारणा घडवून आणण्याच्या कार्यास अग्रक्रम द्यावा ही उदारमतवाद्यांची कळकळीची विनंती विष्णुशास्त्री यांनी सरळ झिडकारली. हिंदू धर्माच्या मागासलेपणामुळे आणि हिंदू समाजव्यवस्थेतील विषमता आणि दुष्ट रूढी यामुळे भारताने स्वातंत्र्य गमावले नाही असे त्यांचे म्हणणे होते. मूर्तिपूजा, विधवांना पुनर्विवाह करण्यास घातलेली बंदी, बालविवाहाची सर्रास प्रथा, जातिभेदाचे पालन ह्या साऱ्या गोष्टी अनिष्ट असूनही पेशव्यांनी त्यांच्या प्रबळ शत्रूविरुद्ध मोठ्या लढाया जिंकल्या आणि एकेकाळी पेशव्यांच्या फौजा हिंदुस्थानच्या सर्व भागात विजयी घोडदौड करीत होत्या. तरीही इंग्रजांनी हिंदुस्थान काबीज केला कारण त्यांच्याकडे अधिक चांगली शस्त्रे होती, प्रशिक्षित सैन्य होते आणि त्याहीपेक्षा जास्त म्हणजे दैव त्यांना अनुकूल होते. जर मने वळवून आस्ते आस्ते परिवर्तन घडवून आणले तर बदलत्या काळाबरोबर पुढे जाण्याइतके हिंदू समाज व धर्म दोन्हीही पुरेसे लवचिक होते असा विष्णुशास्त्री यांना विश्वास वाटत होता.

परंपरा जतन करू पाहणाऱ्यांचा हा नमुनेदार दृष्टिकोन होता. परंपरानिष्ठ माणूस परिवर्तनाला केवळ परिवर्तन म्हणून कधीच विरोध करीत नाही. काही अटींवर परिवर्तनाचा स्वीकार करण्याची त्याची तयारी असते. परंपरानिष्ठ माणसाच्या मतानुसार कोणताही बदल समाजात हळूहळू घडवून आणावा आणि जेव्हा बदल करावयाचा तेव्हा त्या बदलामुळे अधिक चांगली स्थिती निर्माण होईल अशी खात्री झाली तरच तो करावा. प्रत्येक बदलामुळे

भले होतेच असे नाही. इष्ट बदलही अनेक शतके टिकून राहिलेल्या सामाजिक संस्थेची मूळ चौकट बदलणार नाही अशा तऱ्हेनेच घडवून आणावा. 'त्वरा करा पण सावकाश' हे परंपरावाद्यांचे ब्रीदवाक्य असते. सामाजिक व धार्मिक प्रश्नाबद्दलच्या विष्णुशास्त्री यांच्या निबंधामध्ये त्यांच्या परंपरानिष्ठेचे लख्ख प्रतिबिंब उमटले आहे.

२८ फेब्रुवारी, ७ मार्च व १४ मार्च १८८२ च्या केसरीच्या तीन अंकांत त्यांचा अखेरचा निबंध प्रसिद्ध झाला. अकाली मृत्यूमुळे त्यांचा हा निबंध अपुराच राहिला. हिंदुस्थान देशाच्या प्रचंड आकाराबरोबरच येथील जातिव्यवस्थेमुळेही समाजाच्या चिरफळ्या झाल्या असल्याने स्वदेशप्रेम व स्वदेशनिष्ठा यांचा येथे अभाव आहे हे त्यांनी या अपूर्ण निबंधात मान्य केले आहे. पारंपरिक समाजव्यवस्थेतील आपल्या दर्जाविषयी आपापसात भांडण्याबद्दल त्यांनी ब्राह्मणांना दोष दिला. राष्ट्रीयत्वाच्या वाढत्या जाणिवेबरोबर कालांतराने जातीबद्दलच्या संकुचित पण स्वाभाविक निष्ठा क्षीण होत जातील आणि भारतीयांना ऐक्याची व एकात्मतेची नवी जाणीव एकत्र राखील अशी त्यांना आशा वाटत होती.

निबंधमालेत त्यांनी लिहिलेल्या पूर्वीच्या निबंधात या विषयाचे विवेचन त्यांनी केले होतेच. तीच चर्चा त्यांनी पुढे चालू ठेवली होती. चौथ्या वार्षिक आढाव्यात त्यांनी अशीच आशा व्यक्त केली होती. कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या जातींनी ब्राह्मणांप्रमाणेच आपणही भारतीय आहोत हे लक्षात ठेवावे असा सल्ला त्यांनी दिला होता. पाश्चिमात्त्य विद्या घेतलेल्या ब्राह्मणांना त्यांच्याविषयी कसलाच पूर्वग्रह नाही आणि सहभोजन किंवा जातीबाहेर विवाह हे निर्बंध वगळले तर जातिव्यवस्थेने लादलेले अन्य निर्बंध ते मुळीच पाळत नाहीत असेही त्यांनी आश्वासन दिले. अशा स्थितीत वरिष्ठ व कनिष्ठ जातींमध्ये दुरावा व वैमनस्य वाढविण्याचा प्रयत्न झाल्यास त्यामुळे देशाची जास्त हानी होईल असे त्यांना वाटत होते.

विष्णुशास्त्री यांनी हिंदू समाजातील ब्राह्मणांच्या भूमिकेचे जोरदार समर्थन केले. वेदकाळात जातिव्यवस्था नव्हती असे त्यांचे मत होते. वेदकाळानंतर हिंदू समाजाची चार वर्णांमध्ये विभागणी झाली. गुणवत्ता व कार्यक्षमता हे या चातुर्वर्ण्यव्यवस्थेचे अधिष्ठान असल्याने अशा समाजव्यवस्थेतील ब्राह्मणांच्या वर्चस्वाबद्दल त्यांना दोष देणे निरर्थक होते. ख्रिस्ती धर्मगुरू पोप किंवा आर्चबिशप हे काही अरण्यात राहात नाहीत. ब्राह्मणांनी मात्र जंगलात राहून खडतर आयुष्य जगणे पत्करले. धर्माचे पालन करण्यास भाग पाडण्यासाठी इस्लामच्या अनुयायांप्रमाणे त्यांनी कधीही सक्तीचा अवलंब केला नाही. इतरांना शिकवण्याचा किंवा त्यांच्याकडून दान स्वीकारण्याचा खास अधिकार फक्त ब्राह्मणांनीच भोगला हे त्यांनी कबूल केले. ब्राह्मणांनी केलेल्या अपराधाचे स्वरूप कोणतेही असले तरी त्यांना फाशीची शिक्षा दिली जात नसे. मात्र ब्राह्मण हे विद्वान व धर्माचे रक्षणकर्ते असल्याने पारंपरिक समाजात त्यांना खास वागणूक दिली जाणे योग्य होते असे कारण देऊन विष्णु-

शास्त्री यांनी या प्रकाराचे समर्थनच केले. इतर देशातील धर्मोपदेशकापेक्षा, पुरोहितापेक्षा, ब्राह्मणांचे वागणे सर्वसामान्यतः खूपच चांगले होते असे त्यांचे म्हणणे होते. कायद्याची अधिसत्ता आणि कायद्यासमोर सर्वजण समान या पाश्चिमात्त्यांच्या संकल्पना फार मोलाच्या आहेत हे त्यांनी मान्य केले, परंतु इंग्रज ज्या तत्त्वांचा उपदेश करतात ती प्रत्यक्षतः ते आचरणात आणीत नाहीत हे हिंदुस्थानातील न्यायालयात गोरे व काळे यांना दिल्या जाणाऱ्या वागणुकीतील भेदभावावरून उघड दिसते असे त्यांचे मत होते.

ख्रिस्ती धर्मोपदेशक व त्यांचे लोकहितवादी, जोतीराव फुले यांच्यासारखे शिष्य यांच्यावर त्यांनी कोरडे ओढले. वैभवसंपन्न ब्राह्मणी राजवटीचे वैरी म्हणून त्यांनी या मंडळींना दूषणे दिली. त्यांनी आपला सर्व राग यांच्यावर काढला. स्वामी दयानंद व आर्य-समाज यांची जशी त्यांनी हेटाळणी केली तशीच या मंडळींच्या लेखनाचीही त्यांनी हेटाळणी केली. सत्यशोधक समाजाच्या चौथ्या वार्षिक अहवालाचे परीक्षण करण्याच्या निमित्ताने त्यांनी फुले यांच्यावर कडाडून हल्ला चढवला. आपली टीका निष्पक्षपाती व वस्तुनिष्ठ आहे, असा जरी विष्णुशास्त्री दावा करीत असले तरी त्यांच्या उपहासपर लेखनात थोडा व्यक्तिगत आकस होताच. 'गुलामगिरी' या नावाच्या पुस्तकात जोतीराव फुले यांनी कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या रोखाने काही अभिप्राय दिले होते. कृष्णशास्त्री यांचा सरळ सरळ नामनिर्देश त्यात नव्हता. पण देशी वृत्तपत्रांतील महत्त्वाचा मजकूर सरकारच्या निदर्शनास आणून देणारा अधिकारी किंवा दक्षिणा–पारितोषिक समितीचा चिटणीस अशी पदे इंग्रजी राजवटीत भूषविणाऱ्या व्यक्तीचे उल्लेख फुले यांनी आपल्या पुस्तकात केले आहेत. ते वाचणाऱ्या तत्कालीन वाचकास फुले हे खरे म्हणजे कोणावर हल्ला चढवीत आहेत हे सहज ओळखता येत असे. आपल्या वडिलांच्या टीकाकारांना विष्णुशास्त्री यांनी कधीही क्षमा केली नाही याचा उल्लेख आधी केलाच आहे. म्हणूनच सत्यशोधक समाजाच्या चौथ्या वार्षिक समारंभाच्या हकीकतीसंबंधीच्या अहवालावर लिहिताना त्यांनी फुले यांना तुच्छ लेखले आणि त्यांचे लेखन पोरकट आहे असे म्हणून त्याची वासलात लावली. व्याकरणाच्या प्राथमिक नियमासंबंधीचे फुले यांचे अज्ञान व त्यांनी दिलेल्या व्युत्पत्ती यांची त्यांनी मनसोक्त चेष्टा केली. तेव्हा सत्यशोधक समाजाचे मुखपत्र असलेल्या 'दीनबंधु' पत्राने फुले यांची बाजू घेतली. दीनबंधूचे संपादक कृ. पां. भालेकर हे फुले यांचे अनुयायी होते. व्याकरणाच्या चुका न करता प्रथम शुद्ध मराठी लिहावयास शिकावे असा भालेकर यांना सल्ला देऊन विष्णुशास्त्री यांनी त्यांचे आक्षेप उडवून लावले. फुले यांनी मानवी हक्काच्या केलेल्या तरफदारीमुळे आणि सामाजिक समतेसाठी त्यांनी चालविलेल्या लढ्यांमुळे काहीजणांना स्फूर्ती मिळाली होती. हे सारेजण फुले व सत्यशोधक समाज यांच्यावर विष्णुशास्त्री यांनी केलेल्या शिवराळ टीकेमुळे फार दुखावले गेले.

विष्णुशास्त्री यांनी लोकहितवादी यांच्यावरही असाच तुफान हल्ला चढवला होता. लोकहितवादी यांची सात पुस्तके बरेच दिवस आपल्या टेबलावर पडून होती असे त्यांनी

या पुस्तकाच्या विस्तृत परीक्षणात कबूल केले आहे. तरीही या पुस्तकांचे परीक्षण करण्याचा बेत त्यांना अनेक कारणांमुळे पुढे ढकलावा लागला. मुंबई सरकारची नोकरी सोडून दिल्यानंतरच निबंधसंग्रहासकट लोकहितवादींच्या सर्व पुस्तकांचे परीक्षण करण्यास आपण मोकळे झालो, अशी कबुलीही त्यांनी दिली आहे. लोकहितवादी यांची शतपत्रे खरे म्हणजे तीस वर्षांपूर्वी ' प्रभाकर ' या वृत्तपत्रात १८४८ ते १८५० या काळात प्रसिद्ध झाली होती. तीस वर्षांनंतर मुख्यतः या शतपत्रांसंबंधी लिहिण्याचा विष्णुशास्त्री यांचा निर्णय त्यांच्या अनेक मित्रांनाही आवडला नव्हता. विशेषतः त्या परीक्षणातील निर्भर्त्सनेचा सूर त्यांना बिलकूल पसंत नव्हता. " मारलेल्या सापास पुन्हा पुन्हा कशास तडाखे मारता ? " असे लोकहितवादींसंबंधी विष्णुशास्त्री यांनी लिहू नये असा सल्ला अनेक मित्रांनी त्या वेळी दिल्याची आठवण १९२३ साली का. ना. साने यांनी सांगितली होती. " लोकांच्या इनाम-नेमणुका इत्यादिकांचा अपहार करण्यास " लोकहितवादी कारण झाले " असा गैरसमज विष्णुपंतांनी करून घेतला " असल्यामुळे मित्रांच्या सल्ल्याकडे त्यांनी दुर्लक्ष केले आणि लोकहितवादींवर केल्या जाणाऱ्या वारेमाप आरोपांवर विश्वास ठेवून विष्णुशास्त्री यांनी परीक्षण लिहिल्याचे त्यांचे निकटचे मित्र साने यांनी १९२३ साली म्हटले होते.

विष्णुशास्त्री यांचे धाकटे बंधू लक्ष्मणराव यांना १८९२ साली लिहिलेल्या पत्रात वि. मो. महाजनी यांनी म्हटले होते, " तुम्हांला माहीत आहे की नाही मला ठाऊक नाही. पण जेव्हा विष्णुपंत आपले मासिक प्रसिद्ध करीत होते तेव्हाच त्यांच्या निबंधातील एकतर्फी टीकेचा व कठोर वाग्बाणांचा मी त्यांना अनेकदा पत्रे लिहून निषेध केला होता. लोकहितवादींवरील त्यांची टीका मला पसंत नव्हती. एकतर लोकहितवादींवर इतकी कडक टीका करण्याचे कारण नव्हते. शिवाय त्यांच्या लिखाणाचे लोकांना केव्हाच विस्मरण झाले होते. विष्णुशास्त्री यांनी केलेल्या मराठी भाषेच्या सेवेबद्दल मला आदर वाटतो. उच्च विचार तितक्याच उच्च दर्जाच्या भाषेत व्यक्त करता येतात हे त्यांनी स्वतःच उदाहरण घालून सिद्ध केले आहे. मात्र लोकांचे नेतृत्व करण्याऐवजी बऱ्याच बाबतींत लोकांच्या पूर्वग्रहांनाच ते कवटाळतात असे मला वाटत असे आणि तसे मी त्यांना वारंवार बोलूनही दाखवले आहे. ते धर्माचे कडवे अंधभक्त नव्हते तर देशभक्त होते हे खरे आहे. काही वेळा ते लोकसमजुतीवर हल्लाही चढवीत असत. पण दुर्दैवाने त्यांच्या या हल्ल्यांचा विसर पडला आणि आज ' इतिहास ' व ' डॉ. जॉन्सन ' या त्यांच्या निबंधांपेक्षा लोकहितवादी व दयानंद यांच्यावरचे निबंधच लोकांना आठवतात. "

' लोकहितवादी ' या विस्तृत परीक्षणलेखात लोकहितवादी यांच्या खाजगी आयुष्याबद्दल लिहिण्याचा आपला इरादा नाही असे विष्णुशास्त्री यांनी आरंभीच जाहीर केले आहे. तरीही उक्तीनुसार कृती करण्यात लोकहितवादी यांना आलेल्या अपयशाबद्दल त्यांनी नाक मुरडले आहेच. शिवाय लोकहितवादी यांच्या चिरंजीवांचीही विष्णुशास्त्री यांनी कुचेष्टा केली आहे. लोकहितवादी यांचा एक मुलगा कायद्याचा अभ्यास करण्यासाठी इंग्लंडला

गेला होता. तेथे त्याला मदिरा व मदिराक्षी यांचा नाद लागल्याने त्याची दुष्कीर्ती झाली होती. लोकहितवादींवरील परीक्षणपर निबंधात त्यांनी या चिरंजीवासही बोचकारले आहे. त्यांच्या उपरोध-उपहासपर निबंधातील या व्यक्तिगत टिंगल-टवाळीमुळे अनेकदा त्यांचे निबंध चुरचुरीत, खमंग होत असत. लोकहितवादी यांच्या पुस्तकांचे त्यांनी केलेले विस्तृत परीक्षण म्हणजे त्यांच्या निबंधातील जहरी टीकेचा एक खास मासला होता.

उपहास करण्याच्या कलेत वाकबगार असलेल्या विष्णुशास्त्री यांनी आपल्या विरोधकांची एकतर टवाळी केली किंवा त्यांचा मूर्खपणा व दुर्वर्तन यांवर कोरडे ओढले. आदर्श व वस्तुस्थिती यामधील तफावत त्यांनी नेमकी हेरली. माणसे आपण कोण आहोत असा दावा करतात आणि प्रत्यक्षतः ती कशी असतात हे त्यांनी बरोबर दाखवून दिले. उक्ती व कृती यामधोल विसंगतीमुळे निर्माण होणारे ढोंग व दांभिकपणा तसेच होणारी फसवणूक उघडकीस आणणे हे त्यांचे उद्दिष्ट असावे असे वाटते. उपरोध हे त्यांच्या भात्यातील अमोघ अस्त्रांपैकी एक अस्त्र होते. आपल्या टीकेचे लक्ष्य झालेल्या व्यक्तीस हास्यास्पद ठरविण्यासाठी त्यांनी हे अस्त्र वापरले, हे स्वामी दयानंद सरस्वती यांच्या पुण्यात निघालेल्या मिरवणुकीच्या त्यांनी केलेल्या वर्णनावरून स्पष्ट दिसते. लोकहितवादी यांच्यावर ते तुटून पडले आणि त्यांनी जहरी टीकेने लोकहितवादी यांना घायाळ केले. महाराष्ट्रातील फारच थोड्या समाजसुधारकांना लेखणीचे असे जबरदस्त फटके खावे लागले असावेत !

निबंधाखेरीज त्यांनी केलेल्या चटकदार पुस्तकपरीक्षणांमुळेही विष्णुशास्त्री आजही लोकांच्या लक्षात राहिले आहेत. ते मराठी भाषेतील पहिले साहित्यसमीक्षक होते. त्यांनी टीकाशास्त्राची काही सर्वसामान्य तत्त्वे विशद केलीच. शिवाय ती तत्त्वे ग्रंथांचे परीक्षण करताना उत्कृष्टरीत्या वापरलीही ! मल्लीनाथासारखे सुप्रसिद्ध टीकाकार हे खऱ्या अर्थाने साहित्यसमीक्षक नव्हते अशी कबुली त्यांनी त्यांच्या संस्कृत कविपंचकावरील प्रास्ताविक निबंधात दिली आहे. मल्लीनाथ वगैरेंनी नाटकाचे किंवा कवितेचे रसग्रहण कधीच केले नाही. त्यांनी शब्दार्थ स्पष्ट केले आणि संस्कृत कवी व नाटककार यांनी केलेल्या व्याकरणाच्या चुका दाखवल्या. विष्णुशास्त्री यांनी मात्र पाश्चिमात्त्य देशांत प्रस्थापित झालेल्या साहित्य-समीक्षेच्या तत्त्वांचा अवलंब करण्याचा निर्धार केला. म्हणूनच युरोपातील वाङ्मयीन टीकाकार मोठ्या प्रमाणावर वापरीत असलेल्या नव्या पद्धतीचा आपण वापर करीत आहोत अशी त्यांनी घोषणा केली.

'ग्रंथांवर टीका' या त्यांच्या निबंधाने मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रातील वाट उजळून टाकली. कोणत्याही वाङ्मयीन कृतीचे मूल्यमापन करताना टीकाकाराने ज्या निकषांचा अवलंब करावा अशी अपेक्षा असते, ते निकष घालून देण्याचा या निबंधात त्यांनी पहिल्यांदाच प्रयत्न केला. आपण परीक्षणासाठी निवडलेल्या पुस्तकाच्या आशयाचे समीक्षकास सखोल ज्ञान असावयास हवे ! सत्यशोधनाचा त्याने प्रयत्न करावयास हवा आणि सत्य काय याबद्दल खात्री पटल्यावर मत व्यक्त करण्यास त्याने मागेपुढे पाहू नये. कोणा-

विषयीही भय न बाळगता किंवा कोणावर मेहेरबानी न करता अगर मेहेरबानीची अपेक्षा न बाळगता शांत चित्ताने त्याने पुस्तकावर भाष्य करावे आणि आपले निष्पक्षपाती व स्वतंत्र मत द्यावे. त्याचे परीक्षण म्हणजे एखाद्या वकिलाने केलेला एकतर्फी युक्तिवाद असू नये तर ते एखाद्या न्यायाधीशाच्या निकालपत्रासारखे असावे. त्याने कोणाचीही कड घेऊ नये. कोणत्याही वाङ्मयीन कृतीचा सहानुभूतीने विचार करून तिची गुणवत्ता त्याला जोखता यावयास हवी. लेखकाबद्दलचा हेवा किंवा द्वेषभाव यामुळे त्याचे परीक्षण डागाळता कामा नये. लेखकाच्या गुणाबद्दल त्याने प्रशंसा करावी तसेच तटस्थ वृत्तीने त्याच्या कलाकृतीच्या त्रुटी दाखवाव्यात.

'विद्वत्व आणि कवित्व' या विषयावरील निबंधात विष्णुशास्त्री यांनी कवितेच्या स्वरूपाबद्दल चर्चा केली आहे. मोठा कवी हा विद्वान असतोच असे नाही असे त्यांनी त्यात म्हटले आहे. "काव्य म्हणजे तीव्र भावनांचा उत्स्फूर्त, खळाळणारा व ओसंडून वाहणारा प्रवाह" ही वर्डस्वर्थने केलेली प्रसिद्ध व्याख्या उद्धृत करून त्यांनी ती आपल्याला मान्य असल्याचे दर्शविले आहे. "संस्कृतीचा जसजसा विकास होतो तसतशी काव्याला अवकळा येते." असे मेकॉलेप्रमाणेच त्यांनाही वाटत होते. "प्रतिभेच्या ऱ्हासाबद्दलचा हा सर्वसाधारण सिद्धांत" खुद्द मेकॉलेनेही पुढे सोडून दिला हे लक्षात ठेवावयास हवे. मुळात हा सिद्धांत मेकॉलेने १८२५ साली प्रसिद्ध केलेल्या निबंधात मांडला होता. १८२८ साली मेकॉले यांनी लिहिलेल्या ड्रायडनवरील निबंधात आधीची काही विधाने त्यांनी काहीशी बदलली. मात्र जसजशी निर्णयशक्ती परिपक्व होत जाते तसतसा प्रतिभेचा ऱ्हास होतो असे त्यांनी त्यात म्हटले आहे. मेकॉले यांनी रोमँटिक कवींचा (शेली, कीट्स, बायरन) वगैरे) अभ्यास केल्यानंतर त्यांनी आपला सिद्धांत बराच बदलला, हे १८३० साली त्यांनी बायरनबद्दल लिहिलेल्या निबंधावरून स्पष्ट होते. विष्णुशास्त्री मात्र सांस्कृतिक इतिहास व कवित्वाचा विकास याबाबतच्या मेकॉलेच्या आरंभीच्या सिद्धांतांचा पाठपुरावा करीत राहिल्याचे दिसते.

ग्रंथपरीक्षण करणाऱ्याला एखाद्या वाङ्मयीन कृतीच्या आशयाबद्दलचे संपूर्ण ज्ञान असावयास हवे असा ते आग्रह धरीत हे खरे! पण नीळकंठ जनार्दन कीर्तने यांनी शेक्सपियरच्या 'टेंपेस्ट' नाटकाचे जे भाषांतर केले त्याचे परीक्षण करताना आपण मूळ नाटक संपूर्ण वाचलेले नाही हे त्यांनी कबूल केले. भाषांतरकार म्हणून कीर्तने यांचे यश जोखताना चार्लस लँबच्या 'टेल्स फ्रॉम शेक्सपिअर' या पुस्तकावरच आपण जास्त भिस्त ठेवली असल्याची कबुली विष्णुशास्त्री यांनी दिली. महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी 'ऑथेल्लो'च्या केलेल्या मराठी भाषांतराइतकेच कीर्तने यांनी केलेले 'टेंपेस्ट'चे भाषांतर सरस वठले असल्याचा त्यांनी अभिप्राय दिला. वि. मो. महाजनी या त्यांच्या सहाध्यायाने व निकटच्या मित्राने लिहिलेले 'तारा' नाटक म्हणजे शेक्सपियरच्या 'सिंबेलाइन'चे रूपांतर होते. शेक्सपियरच्या नाटकांचे मराठी भाषांतर करण्याची प्रथा सोडून देऊन

महाजनी यांनी नवी वाट चोखाळली होती. मूळ इंग्रजी नाटकाचे रूपांतर करताना महाजनी यांना आलेले अपयश दाखविण्यासाठी विष्णुशास्त्री यांनी मूळ नाटकातील उतारे उद्धृत केले असले तरी रूपांतर करण्याचे आव्हान स्वीकारल्याबद्दल त्यांनी आपल्या मित्रास वाखाणले आहे.

अठराव्या शतकातील मराठी कवी मोरोपंत यांचे विष्णुशास्त्री हे मोठे चाहाते होते. ' मोरोपंतांची कविता ' या दीर्घ निबंधात त्यांनी रेव्हरंड जॉन विल्सन व महादेव गोविंद रानडे यांच्यासारख्या मोरोपंतांच्या टीकाकारांवर सडकून टीका केली. मराठी भाषेवर मोरोपंतांचे विलक्षण प्रभुत्व असले तरी यमक किंवा श्लेष साधण्यासाठी शब्दांच्या कसरती करून त्यांनी शब्दावरच्या हुकमतीचा गैरवापर केला असा विल्सनसाहेबांनी मोरोपंतास बोल लावलेला आढळतो. मोरोपंतांनी रचलेल्या रामायणातही शब्दांचे चमत्कृतिजनक प्रयोग दिपविण्याचा कवीने प्रयत्न केलेला दिसतो त्यामुळे मोरोपंतांचे हे काव्यग्रंथ वाङ्मयात कुतूहलाचे विषय झाले आहेत असे रानडे यांनी भाष्य केले आहे. ' केकावली ' हे मोरोपंतांचे सर्वोत्कृष्ट काव्य समजले जाते. " कलाकृती म्हणून मराठी भाषेत त्याला तोड नाही " हे रानडे यांना मान्य असले तरी त्यापेक्षा जास्त उच्च स्थान देण्यास ते काव्य योग्य नाही असा रानडे यांचा अभिप्राय होता. रानडे यांच्याबरोबर विष्णुशास्त्री यांचा या बाबतीत मतभेद होता. आपले वडील कृष्णशास्त्री हे देखील कवी म्हणून मोरोपंतांना फार थोडी किंमत देत असल्याने त्यांनाही विष्णुशास्त्री यांनी मोरोपंतांच्या टीकाकारांची हजेरी घेताना सोडलेले नाही. मोरोपंतांची कविता कृत्रिम व दुर्बोध असल्याच्या आरोपाचे त्यांनी खंडन केले आहे. मोरोपंत कवी हे मोठे पंडित होते ही समजूत त्यांनी पार उखडून टाकली आहे. वाचकांनी थोडेसे परिश्रम घेतले तर मोरोपंतांचे काव्य त्यांना संपूर्ण समजेल असे विष्णुशास्त्री यांना वाटत होते. अनेक जाणकार वाचकांना त्यांची ही मते मान्य झाली नाहीत आणि पत्रे लिहून त्यांनी मतभेद व्यक्त केले. अशा व्यक्तींमध्ये वामनराव ओक व केशवराव कानेटकर हेही होते. त्यांना उत्तर देताना विष्णुशास्त्री यांनी मोरोपंतांविषयीच्या आपल्या मतांचा पुनरुच्चार केला.

वाचकांना ओढ लावणारी स्फूर्तिदायक निवेदन करण्याची कला साधण्याचा विष्णुशास्त्री यांनी सर्व निबंधांत प्रयत्न केला. मेकॉलेप्रमाणे त्यांनाही वाचकांचा अचूक अंदाज येत असे. निबंधात समर्पक उदाहरणे देणे, युक्तिवाद करणे तसेच रचना कौशल्य साधणे, या बाबतीत कसब दाखवण्याची धमक त्यांच्या अंगी असल्याने वाचक त्यांना हवा तसा प्रतिसाद देत असत. त्यामुळे वाचक सहज जिंकले जात असत. आपल्या निबंधाची मांडणी, त्यातील सम्यक दृष्टिकोन, निबंधातील दाखले व त्याची शैली यांचा वाचकांवर प्रभाव पाडण्यासाठी कसा उपयोग करावा याचा त्यांनी बारकाईने विचार केला होता. त्यांच्या प्रत्येक निबंधाच्या आरंभी प्रसिद्ध संस्कृत किंवा मराठी ग्रंथातील समर्पक अवतरण दिलेले असे. हे अवतरण निबंधाच्या प्रतिपाद्य विषयाशी चांगलेच निगडित असे. आपण निवडलेल्या विषयाच्या

महत्त्वाबद्दल ते सुरवातीस काही प्रास्ताविक अभिप्राय देत असत. कधी कधी आरंभी निबंधाच्या विषयाबाबतच्या प्रचलित कल्पनेबद्दल ते टीकाटिप्पणी करीत असत. त्यानंतर ते प्रतिपक्षाचे म्हणणे प्रथम सादर करीत असत आणि मग ते काळजीपूर्वक खोडून काढीत असत. विरोधकांच्या युक्तिवादाचे खंडन करीत असताना ते आपली मते मांडीत असत आणि अखेरीस मुख्य प्रतिपादनाचा सुरेख सारांश सांगत असत. दृष्टांत देऊन तसेच विरोधाभास दाखवून वाचकांना दिपविणे त्यांना फार आवडत असे. समकालीन घडामोडींचा आडवळणाने उल्लेख करून वाचकांना ते आनंद देत असत. लोकहितवादींवरील त्यांच्या निबंधावरून किंवा सत्यशोधक समाजाच्या वार्षिक समारंभाबाबतच्या अहवालासंबंधी त्यांनी लिहिलेल्या परीक्षणवजा लेखावरून ते प्रतिपक्षाची निष्ठूरपणे टर उडवण्यात पटाईत होते हे उघड दिसते.

मेकॉलेप्रमाणे विष्णुशास्त्री हेदेखील आपल्या काळातील व समाजातील वातावरणाने प्रभावित झाले होते. आपल्या पिढीचा धुमसणारा संताप त्यांनी आपल्या निबंधांतून व्यक्त केला. त्यांच्या पिढीने मोठा दुष्काळ असहाय होऊन पाहिला. शेतकऱ्यांच्या दंगली, वासुदेव बळवंत फडके यांचा सशस्त्र प्रतिकार आणि राष्ट्रीय भावनेचा आविष्कार चिरडून टाकण्यासाठी इंग्रजांनी योजिलेले दडपशाहीचे उपाय या सर्वांना विष्णुशास्त्री यांची पिढी साक्ष होती. जुन्या पिढीच्या पुढाऱ्यांनी रचलेली इंग्रजी राजवटीची स्तुतिस्तोत्रे ऐकण्याचा त्यांना वीट आला होता. म्हणूनच जे लोक त्यांना परक्या सरकारचे बगलबच्चे वाटत असत त्या सर्वांना त्यांनी धारेवर धरले. राष्ट्रात खोलवर रुजलेल्या प्रवृत्तींबरोबर मूलतः तादात्म्य पावल्याने मेकॉलेला समकालीन वाचकांबरोबर सरळ संवाद साधण्याचे सामर्थ्य लाभले होते असे लेस्ली स्टीफनचे मत होते. विष्णुशास्त्री यांच्या बाबतीतही हे तितकेच खरे होते. आपल्या देशवासीयांच्या दुबळेपणातही ते सहभागी असल्यामुळे नकळत उत्स्फूर्तपणे ते आपल्या देशवासीयांची खुशामत करीत असत. सर्व लढाऊ राष्ट्रवाद्यांप्रमाणे त्यांचाही अनेकदा भूतकाळाचे उदात्तीकरण करण्याकडे कल असे. हिंदुस्थानातील सामाजिक व आर्थिक व्यवस्थेच्या अनिष्ट परिणामांचे तटस्थपणे परीक्षण करणे त्यांनी नाकारले. त्याऐवजी पूर्वजांच्या पराक्रमांचे पोवाडे गाणे त्यांना पसंत होते. हिंदू धर्म तसेच हिंदुस्थानातील भाषा यांच्याविषयीच्या आस्थेचे पुनरुज्जीवन करून हिंदुस्थानचा इतिहास व संस्कृती याबद्दलची अभिमानाची जाणीव त्यांनी जोपासली. सामाजिक व धार्मिक परंपरानिष्ठेचा लढाऊ राष्ट्रवादी विचारसरणीबरोबर त्यांनी संयोग साधल्यामुळे त्यांच्या अनेक समकालीनांना त्यांनी आकृष्ट करून घेतले तसेच त्यांना प्रेरणाही दिली.

*

# ६ : मागे वळून पाहताना

विष्णुशास्त्री यांचे १८८२ च्या मार्चमध्ये अकाली निधन झाले. त्यालाही आता शंभर वर्षे होऊन गेली आहेत. या काळात त्यांनी स्थापन केलेल्या काही संस्थांची खूप भरभराट झाली. विष्णुशास्त्री यांच्या मृत्यूनंतर जवळजवळ सहा महिन्यांनी सर विल्यम हंटर यांना न्यू इंग्लिश स्कूलच्या संस्थापकांना भेटण्याची संधी मिळाली. शाळेने झपाट्याने प्रगती केल्यामुळे ते प्रभावित झाले होते. ८ सप्टेंबर १८८२ रोजी त्यांनी अभिप्राय दिला, " या संस्थेची इतकी भरभराट झाली आहे की सबंध हिंदुस्थानात या संस्थेच्या तोडीची एकही संस्था मी अद्याप पाहिलेली नाही असे मी निश्चित म्हणू शकेन. या संस्थेला सरकारकडून अनुदान मिळत नसले तरी या संस्थेची केवळ येथील सरकारच्या शाळेबरोबरच नव्हे तर इतर देशांतील शाळांशी तुलना केली तरीही ती तितक्याच तोडीची किंबहुना काकणभर सरसच ठरेल." मरे मिचेल यांनीही संस्थापकांची प्रशंसा केली. १७ सप्टेंबर १८८२ रोजी त्यांनी संस्थेबद्दलचे मत नोंदविले, " पुण्यातील लोकमत आता एतद्देशीय सद्‌गृहस्थांच्या मतानुसार झुकले आहे. यापैकी बरेचजण जवळजवळ इंग्रज माणसाप्रमाणेच इंग्रजी बोलतात व लिहितात. ते इंग्रजी विद्येचा जोराने प्रसार करीत आहेत. त्यामुळे सरकारी शाळेपेक्षाही त्यांच्या शाळेतील हजेरी जास्त असते असे मला वाटते."

पुण्यातील सरकारी शाळा चालू ठेवण्याची आता आवश्यकता राहिलेली नाही असे रेव्हरंड मॅकिकन यांनी सुचवले, कारण मुंबई सरकारच्या मदतीशिवाय न्यू इंग्लिश स्कूलने बरेच यश संपादन केले होते. शाळेची वाढ झाल्यामुळे २४ ऑक्टोबर १८८४ रोजी डेक्कन एज्युकेशन सोसायटी स्थापन करण्यात आली. २ जानेवारी १८८५ रोजी फर्गसन महाविद्यालय सुरू झाले. टिळक व नामजोशी हे दोघे संस्थापक दहा वर्षांच्या सेवेनंतर राजीनामे देऊन संस्था सोडून गेले तरी आगरकर, आपटे, गोपाळ कृष्ण गोखले यांनी विष्णुशास्त्री यांचे विद्यादानाचे कार्य पुढे चालू ठेवले. विष्णुशास्त्री यांनी इतरांनाही स्फूर्ती दिली. अशा माणसांमध्ये नूतन मराठी विद्यालय व शिक्षण प्रसारक मंडळी यांचे संस्थापकही होते.

१८९१ साली केसरी व मराठा ही साप्ताहिके टिळकांच्या मालकीची झाली. काळाच्या ओघात परंपरानिष्ठ राष्ट्रवाद्यांचे मुखपत्र म्हणून केसरीचा सबंध देशभर नावलौकिक पसरला. विष्णुशास्त्री यांच्या स्मृतिदिनानिमित्त दरवर्षी त्यांचे शिष्य त्यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी कोणातरी ख्यातनाम व्यक्तीस निमंत्रण देत असत. १९०१ साली अशा स्मृतिदिनानिमित्त

भरलेल्या मेळाव्यात लोकमान्य टिळक यांनी एक निबंध वाचला. सुधारणेच्या चळवळींवर हल्ला चढवून विष्णुशास्त्री सवंग लोकप्रियता मिळविण्याचा प्रयत्न करतात असा आरोप विष्णुशास्त्री यांच्यावर केला जात असे. काही धर्म सुधारणा घडवून आणणाऱ्यांचा तसेच काही समाजसुधारकांचा भित्रेपणा व ढोंग उघडकीस आणण्याचे कर्तव्य निबंधमालाकारांना पार पाडावे लागले याची टिळकांनी श्रोत्यांना आठवण करून दिली. निबंधमालेतील कठोर शब्दांचेही टिळकांनी जोरदार समर्थन केले. त्यांच्या मते भाषा हे राष्ट्राचे एक प्रभावी हत्यार असते आणि जो कोणी भाषेला वळण देतो त्याचे लोकांनी ऋणी असले पाहिजे. स्वभाषा, स्वधर्म व स्वदेश यांच्याविषयी प्रेम असणाऱ्या सर्वांनी विष्णुशास्त्री यांच्याबद्दल कृतज्ञता बाळगली पाहिजे असे टिळकांना वाटत होते.

१९०६ साली लोकमान्य टिळकांचे सहकारी न. चिं. केळकर यांनी विष्णुशास्त्री यांच्याविषयी चरित्रवजा छोटा लेख इंग्रजीत प्रसिद्ध केला. त्यात त्यांनी विष्णुशास्त्री यांचे वर्णन ' समंजस कडवे धर्मनिष्ठ गृहस्थ ' अशा शब्दांत केले. राष्ट्राने स्वतःस ओळखावे तसेच भूतकाळातील वैभव समजावून घ्यावे. म्हणजे उन्मत्त किंवा स्वयंपूर्ण न बनता तसेच आपले स्वत्व न गमावता नव्या परिस्थितीशी शहाणपणाने व चांगल्या तऱ्हेने जुळवून घेण्याची कुवत व आपल्या सामर्थ्यावरील विश्वास राष्ट्राच्या अंगी निर्माण होतो असा विष्णुशास्त्री यांना विश्वास वाटत होता. भाषेबद्दलचा खोटा सौम्यपणा टाळून विष्णुशास्त्री यांच्या हातून लेखन करताना मर्यादा ओलांडल्या जात असत हे केळकर यांनी मान्य केले. मात्र विष्णुशास्त्री यांचा उच्च हेतू व त्यांच्या भोवतीची परिस्थिती यांची विष्णुशास्त्री यांच्या टीकाकारांना आठवण करून देऊन केळकर यांनी विष्णुशास्त्री यांच्या निबंधांतील कठोर शब्दयोजनेची तरफदारी केली.

लोकमान्य टिळक व केळकर यांच्याखेरीज अनेक प्रमुख लेखकांनीही विष्णुशास्त्री यांनी महाराष्ट्राची संस्कृती व साहित्य या क्षेत्रात केलेल्या योगदानाचे मूल्यमापन करण्याचा प्रयत्न केला आहे. ज्ञानेश्वरापासून मोरोपंतांपर्यंतच्या मध्ययुगीन मराठी कवींच्या काव्याचा सूक्ष्म अभ्यास केल्याबद्दल लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांची आजही आठवण केली जाते. १९०४ साली निबंधमालेच्या प्रभावाबद्दल निबंध वाचण्यासाठी पांगारकर यांना आमंत्रण देण्यात आले होते. विष्णुशास्त्री यांच्या स्मृतिदिनानिमित्त भरलेल्या सभेत पांगारकर यांनी निबंध सादर केला. टिळक या सभेचे अध्यक्ष होते. परंपरानिष्ठेचे गोडवे गाणाऱ्या पांगारकर यांच्या निबंधाची टिळकांनी प्रशंसा केली. परंपरानिष्ठा हा निबंधमालेचा गाभा होता आणि या बाबतीत विष्णुशास्त्री यांचा दृष्टिकोन एडमंड बर्क, बेंजामिन डिझरेली व सॅम्युएल जॉन्सन यांच्या दृष्टिकोनाशी मिळताजुळता होता असे पांगारकर यांचे मत होते.

विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्यासारख्या विख्यात इतिहासकारांवर निबंधमालेचा कसा जबरदस्त प्रभाव पडला होता या वस्तुस्थितीकडे पांगारकर यांनी श्रोत्यांचे लक्ष वेधले. विष्णुशास्त्री यांच्या देशभक्तीमुळे तसेच मराठी भाषा व हिंदू धर्म यांच्याबद्दलच्या अपार प्रेमामुळे राजवाडे हेलावले होते. ऐतिहासिक विषयावरील विष्णुशास्त्री यांच्या निबंधामुळे

आणि हिंदुस्थानच्या समृद्ध सांस्कृतिक वारशाबद्दल त्यांना वाटणाऱ्या आदरभावनेमुळे महाराष्ट्राच्या उज्ज्वल इतिहासाचे पुन्हा संशोधन करण्याच्या आंदोलनास जोरदार चालना मिळाली. महाराष्ट्रातील या चळवळीचे नेतृत्व राजवाडे यांनी केले. ऐतिहासिक कागदपत्र कसोशीने गोळा करून, त्यांचे संपादन करून त्यांनी अनेक खंडांत प्रसिद्ध केले. त्यांचे महत्त्व विशद करण्यासाठी राजवाडे यांनी या खंडांना विद्वत्तापूर्ण दीर्घ प्रस्तावनाही लिहिल्या. त्यांनी आपले सारे आयुष्य या कार्याला वाहिले. आपल्या विद्यार्जनासंबंधी त्यांनी आत्मवृत्तपर एक निबंध लिहिला आहे. त्यात त्यांनी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे गुरू म्हणून आपल्यावर किती ऋण आहे त्याचा निर्देश केला आहे. विष्णुशास्त्री वगळले तर बाकीच्या शिक्षकांपैकी कोणाचीही आपल्यावर छाप पडली नाही असे राजवाडे यांनी म्हटले आहे.

हरी नारायण आपटे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर व शिवराम महादेव परांजपे यांच्यासारख्या अनेक सर्जनशील लेखकांना विष्णुशास्त्री यांच्या शब्दकलेने व ओजस्वी शैलीने भुरळ घातली. यांपैकी काहीजण त्यांच्या परंपरानिष्ठ विचारसरणीशी सहमत नव्हते. तरीही विष्णुशास्त्री हे मराठी गद्यावर अधिराज्य गाजवणारे एक महान लेखक आहेत अशा शब्दांत या सर्वांनी त्यांचा गौरव केला. खंडेराव भिकाजी बेलसरे यांनी विष्णुशास्त्री यांच्याबद्दलचा पहिला चरित्रपर निबंध लिहिला होता. विष्णुशास्त्री यांची शैली अभिजात आहे असे म्हणण्यापेक्षा ती रोमँटिक आहे असे त्यांनी वर्णन केले आहे. रोमँटिक शैली चैतन्याने चमकते. ती वाचकावर जादू करते आणि सूचकतेच्या वैभवामुळे ती संपन्न असते. हे सारे रोमँटिक शैलीचे गुणविशेष आहेत. रंगीबेरंगी प्रकाशमय वातावरणात सुंदर वस्तूंची आरास मांडावी तसे विष्णुशास्त्री यांच्या रोमँटिक लेखनाचे रूप वाटते. निबंधमालाकारांसारख्या रोमँटिक लेखकाच्या लेखनात वाढता परिणाम साधण्याचा प्रयत्न केला जातो. निबंधाची रूपरेषा गोंधळात टाकणारी होण्याचा धोका पत्करूनही निबंधातील प्रत्येक मध्यवर्ती कल्पना पूरक पण गौण कल्पनांच्या अभ्रांनी झाकळलेली असते. स्वतःवर ताबा असणाऱ्या माणसापेक्षा चटकन प्रक्षुब्ध होणाऱ्या माणसासारखीच विष्णुशास्त्री यांची मनोवृत्ती होती. सर्व रोमँटिक लेखकांप्रमाणे विष्णुशास्त्रीही निबंधाच्या विषयाबरोबर वाहत जात असत. त्यांचे धाकटे भाऊ लक्ष्मणराव यांनी त्यांच्या निबंधाचा हा विशेष नेमका टिपला होता. ख्रिस्ती धर्मोपदेशकांबद्दल किंवा हिंदू समाजसुधारकांबद्दल संतापाने लिहीत असताना आणि लोकहितवादी, कुंटे अगर स्वामी दयानंद यांच्यावर तुटून पडताना आपल्याच शब्दांच्या ओघाबरोबर विष्णुशास्त्री वाहवत जात असत असे लक्ष्मणराव चिपळूणकर यांनी मान्य केले आहे. आपल्या टीकेचे लक्ष्य बनलेल्या माणसाबद्दल ते सतत करीत असलेल्या टीकाटिप्पणीचा काही वेळा निबंधमालेच्या वाचकांनाही कंटाळा येत असे असे लक्ष्मणराव चिपळूणकरांनीही म्हटले आहे.

मराठी भाषेवरील त्यांच्या प्रभुत्वामुळे किंवा त्यांच्या ओजस्वी शैलीमुळे दिपून न जाता काहीजणांनी मात्र त्यांच्या निबंधांतील आशय शांतपणे पारखून घेतला. विष्णुशास्त्री

यांचे मन मुळात चिंतनशील किंवा तात्त्विक विचारांत रमणारे नव्हते असे त्यांना आढळले. विष्णुशास्त्री यांचे काही निबंध तर त्यांना अप्रगल्भ मनातील भावनांचा उद्रेक वाटले. शास्त्रीय किंवा तर्कशुद्ध विचार करण्याची कुवतच विष्णुशास्त्री यांच्याजवळ नव्हती असे काहींना वाटले. स्वामी दयानंद यांच्यावर त्यांनी केलेल्या शिवराळ व पोरकट टीकेचा लोकहितवादी यांनी निषेध केला. आर्यसमाजाच्या संस्थापकांच्या कार्याचे वाजवी मूल्यमापन करणे विष्णुशास्त्री यांना जमले नाही कारण विष्णुशास्त्री यांचे अप्रगल्भ मन आणि त्यांना वाटणारा मत्सर असे लोकहितवादी यांना वाटत होते. विष्णुशास्त्री यांनी घालून दिलेल्या तत्त्वापासून केसरी ढळत आहे असा आरोप काही वाचकांनी १८८३ साली केसरीकर्ते आगरकर यांच्यावर केला. तेव्हा विष्णुशास्त्री यांच्या एकांगी विचारांचे केवळ पडसाद जसे केसरीत उमटणार नाहीत तसेच केसरी त्यांच्या शैलीचेही अनुकरण करणार नाही असे आगरकरांनी जाहीर केले. आगरकरांच्या मते निबंधमालाकारांनी दयानंद, जोतीराव फुले, कुंटे, लोकहितवादी तसेच प्रार्थनासमाजाचे पाठीराखे किंवा खिस्ती धर्माचे समर्थक यांच्यावर केलेली टीका अनुदार होती.

विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात जेव्हा ब्राह्मणेतर चळवळीला उधाण आले तेव्हा ब्राह्मणेतर नेत्यांनी सामाजिक व धार्मिक परंपरावाद्यांवर प्रतिहल्ला चढवला. विष्णुशास्त्री हे दुष्ट ब्राह्मणी राजवटीचे प्रमुख प्रवक्ते होते असे हे नेते समजत असत. दिनकर शंकर जवळकर हे ब्राह्मणेतर चळवळीचे एक जहाल नेते होते. ‘ देशाचे दुष्मन ’ नावाची एक पुस्तिका लिहून त्यांनी विष्णुशास्त्री चिपळूणकर व टिळक या दोघांवर त्वेषाने हल्ला चढवला. टिळक व चिपळूणकर यांचे पुतळे बसविण्याचा पुणे नगरपालिकेने निर्णय घेतला तेव्हा ब्राह्मणेतर नेत्यांनी या निर्णयाला प्रखर विरोध केला. १९२० ते १९३० या दशकात हा वाद उसळला तेव्हा विष्णुशास्त्री हे ज्या परंपरानिष्ठ ब्राह्मणांच्या गटाचे कट्टे पाठीराखे होते त्यांच्याविषयी बहुजनसमाजाच्या पुढाऱ्यांच्या मनात किती तीव्र स्वरूपाची चीड होती हे प्रकर्षाने लक्षात आले.

ब्राह्मणेतर लेखकांप्रमाणे काही ब्राह्मण बुद्धिमंतांनीही विष्णुशास्त्री यांच्या प्रतिगामी दृष्टिकोणाबद्दल त्यांच्यावर कडवट टीका केली. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यासारखा महान लेखक महाराष्ट्रात जन्मला हे निःसंशय महाराष्ट्राचे दुर्दैव म्हटले पाहिजे असे त्र्यंबक शंकर शेजवलकर या ख्यातनाम इतिहासकारांचे मत होते. विष्णुशास्त्री यांच्या स्वयंकेंद्रित वृत्तीमुळे व दुरभिमानी युक्तिवादाने भरलेल्या त्यांच्या निबंधामुळे महाराष्ट्रातील धार्मिक व सामाजिक सुधारणेच्या कार्याची फार हानी झाली आणि महाराष्ट्रातील निवडक लोक अल्पसंतुष्ट व संकुचित वृत्तीचे बनले. सुधारकांच्या मतांचा विपर्यास करून व त्यांची टवाळी करून विष्णुशास्त्री यांनी वाईट उदाहरण घालून दिले असे शेजवलकरांना वाटत होते.

विष्णुशास्त्री यांचे चाहाते तसेच टीकाकार यांच्यामधील वाद आजही सुरूच आहे. तरीही ते मराठी साहित्यातील एका महान युगाचे निर्माते होते आणि त्यांच्या निबंधमालेमुळे मराठी वाङ्मयातील आधुनिक काळास सुरवात झाली ही वस्तुस्थिती त्यांच्या परंपरानिष्ठ दृष्टिकोणाचा धिक्कार करणाऱ्या टीकाकारांनाही स्वीकारावी लागते. ✻

# सूची


(१) चिपळूणकर कृष्णशास्त्री, **अनेक विद्यामूलतत्त्व संग्रह**, चौथी आवृत्ती, १९३२

(२) चिपळूणकर लक्ष्मण कृष्ण, **विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे चरित्र**, १८९४

(३) चिपळूणकर विष्णु कृष्ण, **निबंधमाला**, १८८९

(४) चिपळूणकर विष्णु कृष्ण, **संस्कृत कविपंचक**, तिसरी आवृत्ती, १९३२

(५) पांगारकर ल. रा., **निबंधमालेचे स्वरूप व कार्य**, १९२२

(६) बनहट्टी श्री. ना., **विष्णुपदी**, खंड १, २ व ३, १९७४

(७) बेलसरे कृ. मि., **विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या किरकोळ लेखांचा संग्रह**, भाग १ व २, १८९६

(८) बेलसरे कृ. मि., **विष्णुशास्त्री यांच्या चरित्राचे व लेखांचे साधारण स्वरूप**, १८९६

(९) माडखोलकर ग. त्र्यं. व बनहट्टी श्री. ना., **विष्णु कृष्ण चिपळूणकर**, १९३४

(१०) माडखोलकर ग. त्र्यं., **विष्णु कृष्ण चिपळूणकर : काळ आणि कर्तृत्व**, १९५४


*